वीणा प्रकाशन—४१

# चांकुल्या

पु. भा. भावे




७ एप्रिल १९५१ ] [ मूल्य ३॥ रु.

ध्येयवादी कलाकार, तेजस्वी लेखक व वक्ते, धैर्यशील, उदारचरित

स्वधर्माभिमानी व बाणेदार पुरुष, शिवभक्त **श्री० भालजी**

**पेंढारकर** ह्यांस लक्षावधी रुपयांचे चित्रमंदिर गुंडगिरीनें

भस्मसात् केल्यावर "आतां निदान कोळ-

शांच्या व्यापाराची सोय झाली" हे

निधड्या विनोदाचे तत्त्वज्ञ

उद्गार काढल्या विषयीं

अर्पण —

# पु. भा. भावे यांचें प्रकाशित वाङ्मय.



| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | रक्त आणि अश्रु | ... | ... | लेख संग्रह |
| २ | पहिला पाऊस | ... | ... | लघुकथा |
| ३ | विषकन्या | ... | ... | नाटक |
| ४ | स्वप्न | ... | ... | लघुकथा |
| ५ | सतरावें वर्ष | ... | ... | ,, |
| ६ | श्याम | ... | ... | ,, |
| ७ | अकुलीना | ... | ... | कादंबरी |
| ८ | वाकुल्या | ... | ... | विनोदी लेखसंग्रह |

# थोर पुरुष आणि त्यांचीं चरित्रें

थोर पुरुषांचीं चरित्रें मोठ्या भक्तिभावानें वाचून त्यांतील प्रत्येक शब्द वेदवाक्यांप्रमाणें मानण्याच्या अवस्थेपासून तों थोर पुरुषांना आणि त्यांच्या त्या चरित्रांना कोंपरापासून नमस्कार करण्याच्या अवस्थेपर्यंत आतां मी आलों आहे. कथाकादंबऱ्यांसारखें निःसत्व व कपोलकल्पित वाङ्मय वाचून काळाचा अपव्यय करण्याऐवजीं थोर पुरुषांचीं पौष्टिक व स्फूर्तिदायक चरित्रें पठण करून त्या नमुन्यावर मी माझ्या आयुष्याचा कुतुबमिनार उभारावा असा माझ्या एका गुरुजींचा आग्रह असे. अनेक महाभागांचीं चरित्रें रोज कोळून पीत असतांहि आमच्या त्या मास्तरांचा कोट अखेरपर्यंत मानेवर फाटकाच कां राहिला आणि त्यांच्या वडिलोपार्जित घराला रंगसफेती करणेंहि त्यांना शक्य कां झालें नाहीं, हे प्रश्न खरोखरच विचारार्ह आहेत. बेधडक बाता, ठोकळेबाज असत्यें व सवंग नीतितत्त्वें ह्यांनी खचून भरलेल्या थोर पुरुषांच्या चरित्राऐवजीं आमच्या त्या मास्तरांनीं प्रामाणिक कादंबऱ्या शिरोधार्य केल्या असत्या तर त्यांत त्यांचें अधिक हित झालें असतें. चरित्रग्रंथांत उमटलेल्या थोर पुरुषांच्या (उलट्या) पावलावर पावलें टाकत जाऊन मोठेपणाचा मागोवा काढणारा मनुष्य अखेर मूर्खांतच जमा व्हायचा! कोणंताहि थोर पुरुष आपल्या यशाचें व्यापारी रहस्य चरित्राच्या बाजारांत उघडें मांडण्याइतका प्रामाणिक किंवा अक्कलशून्य नसतो

ही गोष्ट यशाची गुरुकिल्ली अल्प प्रयासांत हस्तगत करावयास उतावीळ झालेल्या प्रत्येक जिज्ञासूनें लक्षांत ठेवली पाहिजे.

कादंबऱ्यावर ताण करील असें कांहीं अस्त्री गोत्राचें कल्पक लिखाण वाचण्याची इच्छा झाल्यामुळें पर्वाच मी थोर पुरुषांचीं कांहीं चरित्रें व आत्मकथा चाळत होतों. त्यापैकीं एकात मला चरित्रनायक अण्णासाहेब ह्यांचेविषयीं पुढील छेदक आढळला.

" अण्णासाहेबाचे आईवडील लहानपणींच निवर्तले, आणि ह्या अफाट व दुष्ट जगात ते उघडे पडले. घरचें अठरा विश्वे दारिद्र्य ! मदत करणारें कोणी नाहीं. परंतु अशा संकटांनीं खचणाऱ्यापैकीं अण्णासाहेब नव्हते ! संकटें जितकीं जास्त तितकेंच त्यांचें धैर्यहि अधिक ! संकटामुळें त्यांनीं आपल्या विद्यार्जनात खंड पडूं दिला नाहीं. म्युनिसिपालिटीच्या दिव्यावर अभ्यास करून ते परिक्षामागें परीक्षा पसार झाले व त्यांच्या त्या तपश्चर्येनें प्रसन्न होऊन अखेर म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षांनीं त्याना एक हरिकेन कंदील बक्षीस दिला ! " ( ठळक ठसा माझा ! )

आतां हा छेदक नीट तपासून पहा ! अण्णासाहेबांचें तेज असह्य वाटून त्यांच्या (म्हणजे अण्णासाहेबांच्या) लहानपणींच त्यांच्या आई-वडलांनीं ह्या जगांतून पळ काढला, हें त्या गुरुजनाच्या दूरदर्शित्वास शोभेल असेंच झालें !

थोर पुरुषांच्या कर्तृत्वाची सुरुवात स्वतःच्या घरीं होऊन त्यांचा पहिला तडाखा नेहमीं आपल्या मातापितरावर बसतो. कारण मातापितर निकालात निघाल्याशिवाय श्रेष्ठाच्या पदरात स्वावलंबनाचें पूर्ण श्रेय पडणें अशक्य असतें. तेव्हा अण्णासाहेब ह्या थोर पुरुषाचे आईवडील लहान-पणींच त्यांच्या वाटेंतून वेगळे झाले. हें रीतीस अनसरूनच झालें. संकटांनीं

अण्णासाहेब खचले नाहींत, उलट त्यांचें धैर्य वाढतच गेलें, हेंहि थोर पुरुषांच्या रिवाजास शोभेल असेंच होय. परंतु म्युनिसिपालिटीच्या दिव्यावर अभ्यास करून अण्णासाहेबांनीं परिक्षामागून परिक्षा दिल्या—येथें मात्र कल्पनाविलासाच्यासुद्धा मर्यादा सुटल्या ! अंधारात पाहण्याची शक्ति असणारा एखादा घोडा किंवा बैल कपाळावर चष्मा सारून नगरपालिकेच्या दिव्याखालीं "सत्याचे प्रयोग" चघळत बसला होता, ह्या विधानांवर एक वेळ विश्वास ठेवतां येईल ! पण अण्णासाहेबांसारख्या दोन पायाच्या मनुष्यानें नगरपालिकेच्या दिव्यावर बुकें वाचून एक नव्हे, तर अनेक परिक्षा दिल्या, ह्यावर अतिशय भाविक मनुष्यानें तरी कसा विश्वास ठेवावयाचा ! नगरपालिकेनें लावलेल्या दिव्याविषयीं आज जनता कंठरवानें जें बोलत असते, तें सर्व खोटेंच काय ?



त्या कंदिलांतलि तेल
चोरूनही मोठा झाला असेल

परन्तु चरित्रलेखकांनीं म्युनिसिपालिटीच्या दिव्यांच्या वतीनें आजपर्यंत येवढा प्रचार केला आहे, कीं त्या दिव्याखालीं झालेल्या अभ्यासाची दैदीप्यमान कथा वाचक अगदीं डोळे मिटून गिळतील. थोर पुरुषांचा अभ्यास नगरपालिकेच्या दिव्यावरच झाला पाहिजे, तो एखाद्या देवळांतल्या, धर्मशाळेंतल्या किंवा घरांतल्या दिव्यावर होतां कामा नये, ही गोष्ट आता अगदीं ठरून गेली आहे ! तिच्याविषयीं अवाक्षर काढण्याची कोणाला सोय उरलेली नाहीं ! चरित्रग्रंथांतील हवाले वाचून जास्तच मस्त झालेला एखादा नगराध्यक्ष आणि रस्तोरस्तीं म्युनिसिपल दिव्यांच्या ठेंचा

खाणारा एखादा दीन करदाता, ह्यांत पुढील संवाद होण्यास कांहींच हरकत नाहीं :—

**करदाता :** अध्यक्षमहाराज, आपल्या गांवांतील दिव्यांची अवस्था फार वाईट आहे !

**अध्यक्ष :** कां बरं ?

**करदाता :** डोंगरासारखे दगड, आणि समुद्रासारख्या दलदली दाखविण्यापुरता प्रकाशही आपले दिवे पाडत नाहींत !

**अध्यक्ष :** Nonsense ! मुंगी येवढीं अक्षरें उत्तम प्रकारें वाचतां येतील असा आपल्या दिव्यांचा उजेड आहे !

**करदाता :** काय म्हणतां सरकार ?

**अध्यक्ष :** आजपर्यंत अर्धा डझन थोर पुरुषांचे अभ्यास आमच्या दिव्याबर पार पडले आहेत ! माझा स्वतःचा अभ्यासहि तसाच झाला ! गरीब विद्यार्थ्यांची सोय आम्हांस प्रथम पाहिली पाहिजे ! भावी थोर पुरुषांच्या वाचनांत व्यत्यय येईल, अशा तऱ्हेचा हस्तक्षेप आपल्या प्रकाशयोजनेंत करणें मला इष्ट वाटत नाहीं !

"माझा स्वतःचा अभ्यासहि सार्वजनिक दिव्यावर झाला" असा हवाला देणाऱ्या मासलेवाईक माणसाकडे सहज दृष्टी फिरविली तरी ह्याचा अभ्यास सार्वजनिक किंवा खाजगी ह्यापैकीं कुठल्याच दिव्यावर झालेला नाहीं, परंतु ह्या गृहस्थाचा खोटे बोलण्याचा अभ्यास मात्र जबरदस्त आहे, ही गोष्ट ध्यानांत येते.—तर मग हा थोर पुरुष झाला तरी कसा ? मोठेपणाचा मार्ग ह्याला खरोखरच म्युनिसिपालटीच्या मिणमिणत्या दिव्यानें दाखविला काय ?—परंतु ह्या रहस्याचा मागमूसहि तो किंवा त्याचा चरित्रकार तुम्हांस लागूं देणार नाहींत. सार्वजनिक दिव्याकडे

बोट दाखवून ते खुशाल "तारुण्य व विवाह" ह्या प्रकरणाकडे चालूं लागतील !

* * *

आतां हा दुसरा मासला पहा. "जन्म व बालपण" ह्या प्रास्ताविकानंतर हटकून येणाऱ्या "विद्याभ्यास" ह्या भागांत तो मला सांपडला :—

" ... माधुकरी मागणारा, वर्तमानपत्रें विकणारा, कपबशा विसळणारा आणि छापखान्यांतून खपणारा तेव्हाचा लहानगा अनंत पुढें पदवीधर रा. ब. अनंतराम होईल, असें कोणाच्या स्वप्नांत तरी आलें होतें काय ? ज्या मास्तरांचीं घरकामें तेव्हा रावबहादुरांनीं केलीं व ज्यांनीं त्या काळात छोट्या अनंताची निर्दय चेष्टा केली, ते आज कोठें आहेत ? तुमच्यासारखा पदवीधर होईन तरच नांवाचा...असें म्हणून कोपऱ्यात टोपी भिरकावणाऱ्या अनंताची मूर्ति परिस्थितिशीं लढा देणाऱ्या कोणाहि विद्यार्थ्यास स्फूर्तिप्रदच वाटेल..."

आज आपल्या दोनशे पौंडी देहानें वजनकांटे गरगरा फिरविणाऱ्या **रा. ब. अनंतरामांनीं**—पण तेव्हांच्या "**लहानग्या अनंता**"-नें परिस्थितीशीं लढा दिला हें निस्संशय ! पण त्याचा लढा गनिमी काव्याचा होता, हें मात्र चरित्रकार एका शब्दानेंहि सागत नाहीं ! रावबहादुरी मिळविण्यासाठीं लागणारे गुण **अनंतरामांच्या** अंगीं जन्मतःच भरपूर प्रमाणांत होते, पण विश्वविद्यालयाची पदवी मिळविण्याइतकी बुद्धीमत्ता त्यांच्या पदरीं कधींच पडली नव्हती असे त्यांचे जुने आश्रयदाते व जाणकार सांगतात ! ऐन माजघरापर्यंत प्रवेश मिळवून बायकांत लुडबुड करणें, मास्तरांच्या बायकांची स्तुति करून त्यांचीं घरकामें उरकणें, वात्सल्याचा आव आणून शेंबड्या पोरांचीं नाकें पुसणें

व सरांस घरधन्यांचीं तोंडें पुजणें, इत्यादि कलात छोटा अनंत बालवया-पासूनच तरबेज होता. परिक्षेशीं समोरासमोर सामना देऊन आपलें भागणार नाहीं, हें त्या चलाख पोरानें तेव्हांच ओळखलें ! आणि मास्तर-लोकांच्या अंतःपुरापर्यंत असलेल्या आपल्या प्रवेशाचा लाभ घेऊन त्यानें परीक्षेचे पेपर फोडावयास सुरवात केली ! इतर अनेक उद्योग व उपद्व्याप करीत असतां, बाल अनंतला अभ्यास करण्याइतकी फुरसत सापडणें शक्य नव्हतें, व तशी त्याची कुवत नव्हती ! म्हणून अभ्यासाच्या राजमार्गाऐवजीं यशाची वेगळीच चोरवाट त्यानें शोधून काढली ! शाळेच्या वार्षिक परिक्षांचे पेपर फोडणें हा तर त्याच्या डाव्या हातचा मळ होऊन बसला, पण छापखान्यात काम करीत असतां जुळाऱ्यांशीं संधान जुळवून त्यानें विश्वविद्यालयाचे पेपर्सहि बिनचूक फोडले !

परंतु **रावबहादुर अनंतरामाच्या** जीवनरामायणांतील " विद्याभ्यास " नामक काण्डांत ह्या त्यांच्या अस्सल कर्तृत्वाचा कुठें उल्लेख असेल तर शपथ ! त्यांच्या चरित्रकारानें आपल्या कथानायकाच्या विद्यालयीन यशाची खुबी वर्णन करीत असतां, " कुशाग्र बुद्धिमत्ता " " अभ्यासाची आवड " " असामान्य स्मरणशक्ती " " सतत परिश्रम " असल्या शब्दांचा धुरळा उडवून **अनंतरामांच्या** चलाख चोरपावलाचे ठसे पार झाकून टाकले आहेत !

* * *

ज्याचें तोंडीं चरित्र मुद्रित चरित्रापेक्षां जास्त प्रख्यात व बिनचूक आहे अशा एका उद्योगी उत्साहपतीच्या जीवनकथेतील पुढील उतारा वस्तुस्थितीशीं ताडून पाहण्यासारखा आहेः—

"...काम-अधिक काम—व हंसत मुखानें काम, हें के. **महादेव** ह्यांचें तारुण्यापासून ब्रीदवाक्य होतें ! **सर गंगाधर** व आमचा चरित्र

नायक ह्यांच्या भेटीचा दिवस म्हणजे आमच्या चरित्रनायकाच्या आयुष्यांतील कलाटणीचा व क्रांतीचा दिवस होय! हा दिवस पुढें अक्षरशः सोन्याच्या अक्षरांनीं लिहिला गेला. कारण **के. महादेव** ह्यांच्या अंगांतील सचोटी, उद्योगप्रियता, आनंदी वृत्ति, प्रामाणिकपणा ह्यांची पहिल्या भेटींतच त्या मिलमालकावर येवढी छाप पडली कीं पाचच मिनिटांत **सर गंगाधर** ह्यांनीं त्यांची स्वतःचा वैयक्तिक कार्यवाह म्हणून नेमणूक केली व पुढें पांचच महिन्यांनीं त्यांनीं आमच्या चरित्रनायकाचा आपल्या विद्यागौरी नावाच्या लाडक्या कन्येशीं विवाह लावून देऊन त्यांस आपले जामात करून घेतले!"

उद्योग–उत्साहपीठाचे आचार्य, प्रसिद्ध कारखानदार, व्यापारी, आणि पेढीवाले **श्री. के महादेव** ह्यांचे **सर गंगाधर** ह्यांच्या कन्येशीं तडकाफडकी लग्न लागलें ह्यांत संशयच नाहीं. परंतु मिस्टर **के. महादेव** ह्यांच्या सचोटी, प्रामाणिकपणा, उद्योगप्रियता, कार्यक्षमता, इ. इ. गुणसमुच्चयावर निहायत खूष होऊन **सर गंगाधरांनीं** आपली कन्या **के. महादेव** ह्यांना अर्पण केली हें बिलकूल खरें नाहीं! आपल्या कांहीं आठवड्याच्या कारकीर्दींतच उद्योगी गृहस्थ **के. महादेव** ह्यांनीं विद्यागौरीशीं इतके निकटचे व इतके निकडीचे संबंध उत्पन्न केले, कीं कपाळ पिटून घेत आपली मुलगी व बराचसा पैका **श्री. महादेव** ह्यांच्या पदरात बांधण्याखेरीज **सर गंगाधरांना** गत्यंतर उरलें नाहीं! **के. महादेव** ह्यांच्या आज भरभराटीस आलेल्या अनेक उद्योगांचें मूळ भांडवल हें असें आहे! उद्योग उत्साहाचा मार्ग प्रामाणिकपणें चोखाळणारे त्यांचे समकालीन आज भीक मागत आहेत व सासऱ्याच्या गिरणींतून निघणाऱ्या कापडाची सोल एजन्सी उपटणारे **के. महादेव** मात्र स्वावलंबी उत्कर्षाचा आदर्श बनून राहिले आहेत!

विद्यागौरीसारख्या पोरीला सर करतांना के. महादेव ह्यांनीं अभिनय, थापा, भुलावणी, थोतांड, आकर्षण, ह्यांपैकीं कोणत्या अस्त्राचा अवलंब केला, हें त्यांच्या चरित्रकारानें वास्तविक विशद करून सांगावयास पाहिजे. कारण त्या नाजुक डावपेचामुळेंच ते प्यायाचे फर्जी झाले. त्यांच्या यशाचें खरें रहस्य तेंच आहे ! परंतु अज्ञानामुळें, मिंधेपणामुळें, किंवा केवळ भेकडपणाचा व पाजीपणाचा भाग म्हणून त्यांचा चरित्रकार या प्रकरणाविषयीं मूठभर मूग गिळून स्वस्थ बसेल. आणि उद्योग उत्साह, हास्यमुख, शील, ह्यांच्या डोक्यावर के. महादेव ह्यांच्या यशस्वी जीवनाची घागर चढवून भोळया वाचकाची खुशाल दिशाभूल करील !

* * *

" जन्म व बाळपण "—" मूलग्राम व मातापितरें "—" विद्याभ्यास " इत्यादि प्रकरणांपासून थापेबाजीचा जो प्रकार सुरू होतो, तो तहत "तारुण्य व विवाह " कर्तबगारीचा कळस " स्वभाव हीरकाचे पैलू " इत्यादि प्रकरणापर्यंत, येवढेंच नव्हे तर " महाप्रस्थान " "अखेरचे दिवस" "ये धांवत मृत्यु" " अंत आणि नंतर" ह्या प्रकरणापर्यंत पुरून वर " आठवणी " साठीं भरपूर प्रमाणांत उरतो !

देशभक्त गोपूकाकांच्या चरित्रांतील " सहचारणीच्या सहवासांत " ह्या प्रकरणांतील पुढील उतारा पहा--

" राधाबाईसारखी सहचारिणी मिळाल्यामुळें दे. भ. काकांच्या संसाराचें नंदनवन बनलें आहे ! केवळ वैयक्तिक संसारांत गुंगून राहण्याऐवजीं ती माउली साऱ्या राष्ट्राचा संसार आपलाच मानते ! दे. भ. गोपूकाकाच्या कोणत्याहि कार्यांत खांद्याला खांदा लाऊन राधाबाई आपला वाटा आनंदानें उचलतात ! केवळ देश स्वतंत्र होईल तर राधेच्य

'पायाऱ्या सांवलींत मी माझें उर्वरीत आयुष्य मोठ्या सुखानें घालवीन असे अभिमानाचे उद्गार दे. भ. कांका पत्नीविषयीं नेहमी काढतात ! !"



देशभक्त काका व देश सेविका

देश लवकर स्वतंत्र होणार नाहीं ही खात्री असल्यामुळेंच असले धाडसी उद्गार काढण्याची दे. भ. काकांची छाती होते, हें त्यांच्या निकटवर्तीयांना चांगलें ठाऊक आहे. वरचा सबंध छेदकच असत्यांनीं कांठोकांठ भरलेला आहे. पतीच्या खांद्याला खांदा लावण्याची संधि राधाबाईना कधींच मिळत नाहीं. तो मान देशसेविका पटकावतात. पतीच्या अंगीकृत कार्यातला वाटा त्या उचलत नाहींत, कारण पतीला कांहीं अंगीकृत कार्य आहे, असें त्यांना वाटत नाहीं. ( लष्करच्या भाकरी भाजून त्यांतील कांहीं आपण खाण्यापेक्षां गोपूकाकांनीं सरळ चाळीस रुपयांची कारकुनी करावी असा आजहि राधाबाईचा आग्रह आहे. ) वैयक्तिक संसारांत राधाबाई गुंगून राहिल्या नाहींत. कारण गुंगण्यासारखा

संसार उभा करण्याइतकी गोपूकाकांची कधीच ऐपत नव्हती. जगाच्या संसाराकडे राधाबाई आपुलकीच्या नजरेनें न पाहतां रागीट मत्सराच्या एकटकी नजरेनें पाहतात आणि राधाबाईसारखी सहचारिणी मिळाल्यामुळें संसाराचें नंदनवन झालें आहे, असें वाटण्याऐवजीं तेथें नागफणीचा भला मोठा फड उभा झाला आहे, असें गोपूकाकांना वाटतें, ही गोष्ट आतरप्रांतीय देशसेविकाच्या मेळाव्याकडील दे. भ. काकांचा झुकता कल पाहिल्यावर कोणालाहि कळण्याइतकी स्पष्ट आहे !

थोर पुरुषाची पत्नी कितीहि आळशी, मूर्ख, आकस्ताळी किंवा भांडखोर असली, तरी तिनें आपल्या पतीच्या खांद्याला खांदा लाविला पाहिजे, त्याच्या अंगीकृत कार्यांतला वाटा उचलला पाहिजे, तिला स्वतःचा संसार संभाळण्याची अक्कल नसली तरी बेहेत्तर, पण तिनें जगाचा संसार केला पाहिजे, ह्या पुरोगामी कल्पनेचा जुलूम थोर पुरुषाच्या स्त्रियांवर आणि थोर पुरुषावर निष्कारण होत असतो. शिवाजीच्या कर्तृत्वाशीं त्याच्या स्त्रियाचा कांहींएक संबंध नव्हता, नेपोलियनच्या भाग्याला त्याच्या स्त्रियानीं कलंक लावला, सॉक्रेटीसला आपल्या बायकोचा विलक्षण उच्छाद झाला, अलेक्झँडरच्या अंगीकृत कार्यांतला योग्य वाटा त्याच्या स्त्रीनें कधींच उचलला नव्हता, आणि चेंगीझखानाच्या अर्धांगीचें तर नांवहि जनतेला माहीत नाहीं, ही गोष्ट पुरोगामी अवसानानें भारलेले चरित्रलेखक विसरतात ! बाबर, अकबर किंवा औरंगजेब ह्यांच्यासारख्या घाऊक प्रमाणावर लग्नें करणाऱ्या बहुविवाहित श्रेष्ठांच्या शेंकडो बायकांनीं जर त्या थोर पुरुषाच्या अंगीकृत कार्यांतला आपआपला वाटा उचलण्यासाठीं कंबर कसली असती, तर त्या थोर पुरुषांना करण्यासारखें असें ह्या जगांत कांहींच शिल्लक उरलें नसतें !

थोर पुरुषांच्या साचेबंद चरित्रांनीं गाफील वाचकांचा जितका दावा साधला आहे—तितकाच त्या महाभागांविषयींच्या दंत-कथांनीं अज्ञजनास धोका दिला आहे. सत्याची महती भडकपणें वर्णन करून सांगत असता बागेंतल्या झाडावर आपली नवी कुऱ्हाड चालवून पाहणाऱ्या "लहानग्या" जॉर्ज वॉशिंग्टनची सत्यप्रतिज्ञ कथा आपणांस नेहेमी निवेदन करण्यांत येते. लहानग्या थोर पुरुषानीं बागेंतल्या झाडांवर कुऱ्हाड चालवावी, किंवा गाढवाच्या निरुपद्रवी शेपटीस फटाक्याची लड बांधावी, अथवा कांचेच्या तावदानांवर दगड मारून त्याचा चक्काचूर करावा, हें अगदीं साहजिक होय! ह्या कठोर व न्याय-शून्य जगांत यशस्वी होण्याची पूर्वतयारी, म्हणून हे सारे व्यायाम त्याना अत्यावश्यक आहेत! हातात धारदार हत्यार येताक्षणींच गोऱ्या कातडीच्या वॉशिंग्टननें बागेंतल्या सुंदर झाडावर प्रहार करीत सुटावें ह्यात काहीं नवल नाहीं. ह्या नवलकथेचा उत्तरार्ध मात्र तितकासा विश्वसनीय वाटत नाहीं. बापानें अपराधाविषयीं हटकताच आपली सत्य-वचनी छाती पुढें काढून "बाबा, म्या तीं झाडें तोडलीं!" असली महामूर्ख कबुली देणाऱ्या जार्जचें चित्र जितकें बेभरंवशाचें वाटते तितकेंच त्याच्या टाळक्यात त्याच कुऱ्हाडीचा दांडा घालण्याऐवजीं त्यास शाबासकी व क्षमा देणाऱ्या त्याच्या बेवकूफ बापाचें वाटतें! जॉर्ज वॉशिंग्टन हा पुढें अव्वल दर्जाचा राजकारणी, नेता व सेनानी झाला, ही गोष्ट लक्षात घेता, सत्यवचनाची बालपणीं जडलेली दुष्ट खोड, त्यानें पुढें लवकरच दुरुस्त केली असली पाहिजे, ह्याविषयीं खातरजमा पटते!

चाकू, कात्र्या, सुऱ्या, वस्तरे, वीज व थोर पुरुषांचीं चरित्रें हीं बालबुद्धी वाचकांचीं खेळणीं नव्हत! सोडलेले शब्द व दडवलेला अर्थ लाऊन त्या महाभागांचीं चरित्रें वाचणें ही एक कठीण कला आहे.

"काकासाहेब कोणत्याहि संस्थेला सढळ हातानें व निरपेक्षबुद्धीनें देणग्या देत" ह्या वाक्याचा अर्थ काकासाहेब गुपित दान करीत, किंवा आपली छबी वर्तमानपत्रांतून येण्याची चोख व्यवस्था ते करीत नसत किंवा कोणत्या तरी दूरस्थ हेतूनें त्या संस्थेच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा त्यांचा हेतू नसे, असा होत नाहीं. "बाबांचे—बाबासाहेबांना सर्व लोक प्रेमानें "बाबा" च म्हणत—संबंध लहानथोरांशीं अत्यंत गोडीगुलाबीचे असून ते अजातशत्रू होते." ह्या वाक्याचा खरा अर्थ बाबा सगळयांशींच गुळचट बोलत असून कोणाविषयींच त्यास फारसा जिव्हाळा नव्हता, व कोणाचेंच ते प्रसंगीं मित्र नव्हते, असा होतो. चरित्रग्रंथांतून वाळूंतल्या शंखाप्रमाणें पसरलेल्या "नम्र" "मितभाषी" "मधुभाषी" "त्यागी" "भले" "चागले" "जीवनकार्य" "सर्वस्वाची होळी" इत्यादि शब्दाचा अर्थ लावतांना वाचकानें अत्यंत जपून असलें पाहिजे. एखाद्या सुप्रसिद्ध नटीविषयीं अतिशय भाबडा चेहेरा करून तिचा चरित्रकार तुम्हांला बिनदिक्कतपणें सागेल कीं—"पदवीधर व कुलीन असूनहि केवळ कलेच्या सेवेसाठीं त्यानीं सामाजिक रूढी झुगारून देऊन रजतपटावर पदार्पण केलें, व आपल्या जाज्वल्य उदाहरणानें भगिनीवर्गास असें दाखवून दिलें कीं केवळ कलागुणावर यशाचें परमोच्च शिखर गाठणें, व आपलें चारित्र्य ह्या धंद्यांतहि निष्कलंक ठेवणें अगदी सहज आहे."

आतां वरील विधानांवर शब्दशः विश्वास ठेऊन जर खरोखरच एखादी कलोपासक तरुणी सिनेमाधंद्याशीं तोंडओळख करावयास जाईल तर तिला अजब अनुभव येतील. कारण "यशाचें परमोच्च शिखर" गांठण्यापूर्वी उपरिनिर्दिष्ट चैनी, कर्जबाजारी व कंगाल नटी किती दिवस "एक्स्ट्रा" म्हणून खितपत पडली होती व "प्रसिद्ध अभिनेत्री" होण्यासाठीं निर्माता, दिग्दर्शक व भांडवलवाला, ह्यांनीं ह्या "निष्कलंक

चारित्र्याच्या" बाईकडून कोणतें मोल घेतलें, ह्याचा त्या नवशिक्या मुलीला पत्ता नसणार! "कलेची सेवा" म्हणजे "पैशाचा ह्व्यास"— "रूढी झुगारणें" म्हणजे "स्वच्छंदानें वागणें" केवळ "कला गुणावर" म्हणजे "अनेक प्रकारचे गुण उधळून" वगैरे शब्दकोषही तिला अपरिचित असणार!

अशा अवस्थेंत त्या नटीचें चरित्र शिरसावंद्य करून त्याप्रमाणें वागणारी मुलगी मोलकरीण होईल, एखाद्या उद्योगपतीचा छापील जीवनादर्श समोर ठेवणारा होतकरू तरुण पानपट्टीचें दुकानहि काढूं शकणार नाहीं, आणि पांढऱ्यावरील काळ्यावर विसंबून नेतेपणासाठीं खटाटोप करणाऱ्या माणसासमोर अल्पावधींतच पागलखान्याचीं कवाडें खुलीं होतील!

वर्तमानपत्रें, मासिकें, चरित्रें, व्याख्यानें संदेश, भेटी, चित्रें, इत्यादि अनेक मार्गांनीं स्वतःविषयीं असंबद्ध अफवा उठवीत राहण्याचा थोर पुरुषांचा उद्योग सतत चालू असतो. त्या अफवांवर भाळून तुम्हीं जेव्हा एखादा राजबिंडा पुरुष पाहण्याची अपेक्षा करतां, तेव्हा एखादा भडमुंजा तुम्हांस भेटतो, पुरुषसिंह म्हणून तुम्हीं ज्याचेविषयीं कल्पनाचित्र रंगवितां तो केवळ भुरटा कोल्हा ठरतो, आणि सर्वसंग-परित्यागी साधु म्हणून तुम्हीं जेव्हां एखाद्यास भेटावयास जातां, तेव्हां त्या सत्पुरुषाची दृष्टि तुमच्या डाव्या हातांतल्या आंगठीवर खिळली असल्याचें तुमच्या लक्षांत येतें!

आपल्या यशाची गुरुकिल्ली काळजीपूर्वक स्वतःच्या कंबरेशीं दडवून ठेवणारे थोर पुरुष मोठ्या प्रमाणांत सांपडत असले, तरी "जनते" च्या नितांत मूर्खपणावर विसंबून मोठेपणाच्या सातव्या स्वर्गांत स्थिर झालेले कांहीं महाभाग असेहि आहेत, कीं, जे बेडरपणें स्वतःच्या मूळ स्वरूपांत

खुशाल प्रकट होतात. अशाच एका महापुरुषाच्या भेटीस मी गेलों असतां पुढील बोधप्रद संवाद घडला:—

**मीः**—तुम्हीं स्वतःच्या महत्त्वाकांक्षेसाठीं आपल्या सहकाऱ्यांचे गळे कापलेत हें खरें आहे काय ?

**महापुरुषः**—अगदीं खरें आहे ! महत्वाकांक्षेसाठीं सहकाऱ्याचे गळे कापावयाचे नाहींत तर काय स्वतःचा गळा कापून घ्यावयाचा ?

**मीः**—व्यवहारात सत्याच्या नांवाखालीं तुम्हीं असत्याचार करतां हें खरें ना ?

**महापुरुषः**—अगदीं खरें ! व्यवहारांत असेंच करावें लागतें !

**मीः**—ह्या वयांतहि स्त्रियांविषयीं तुम्हांला......

**महापुरुषः**—बरोबर ! बायकांविषयीं मला फार मोह वाटतो ! नेहमींच वाटत होता ! बायकांविषयीं मोह वाटायचा नाहीं तर काय तुमच्याविषयीं वाटायचा ?

**मीः**—ह्या गोष्टी बेधडकपणें कबूल करताना तुम्हाला काहींच भीति वाटत नाहीं ?

**महापुरुषः**—त्यांत भीति कसली वाटायची ? ह्या गोष्टी मी मूर्खपणामुळें कबूल करतों असें तुम्हास वाटतें कीं काय ? आता ह्या गोष्टी मी जितक्या अधिक खुलेपणानें कबूल करीन, तितकाच लोक माझ्या सत्यवादित्वाविषयीं अधिक जोरानें डंका वाजवतील ! छपवाछपवीची गरज लुंग्यासुंग्या नवशिक्या पुढाऱ्यांना ! माझ्या सारख्याला कोणाच्या बापाची भीति वाटणार ? —वाचकवर्ग ! बोला आतां !!

नवा झंकार–दिवाळी १९४५

# फुलांमुलांविषयीं चार विचार

फुलें आणि मुलें ह्यांची वागी आणि भात अथवा बटाटे आणि वडा ह्या प्रमाणेंच एकमेकास चिकटून असणारी दुकल निर्माण करून कविलोकांनीं तिचा निष्कारण का गाजावाजा चालविला आहे, हें अजून मला नीटसें उमगलें नाहीं. सदरहू जोडगोळीपैकीं नग नंबर एक-विषयीं माझी मुळीच तक्रार नाही. झेंडूच्या फुलांतील खोबरें, गुलाबाच्या फुलाचा गुलकंद व केळफुलांची भाजी, ह्यांचा मी बालपणापासून निस्सीम भक्त आहे. परंतु मुलांविषयीं म्हणाल, तर तरवारीच्या पात्यानें येरुशलेमांतील बालगोपाळाची खबर घ्यावयास निघालेल्या हेरॉड राजाची बाजू ऐकून घेण्यासारखी असली पाहिजे असें माझें स्पष्ट मत आहे. ह्या विषयात कवि लोकाचा निर्वाळा मानावयास मी मुतराम सिद्ध नाहीं. ऐतिहासिक काळापासून मुलांनीं सतत कवि लोकाच्या काव्याचा विषय व्हावयास सिद्ध असावे, व झांडून साऱ्या कवींना मूलजातीचा एखादा तरी कवितावद्ध गालगुच्चा घेतल्याशिवाय आपल्या प्रतिभेचें सार्थक झाल्यासारखं वाटू नये, ही एकच गोष्ट कवि व त्याचा लाडका काव्यविषय ह्या दोहोंच्याहि सारखीच विरुद्ध जाण्यासारखी आहे.

झाडांवर चढणें, उनाडणें सायकलीच्या वॉलट्यूब्ज काढणें, फडताळें धुण्डाळणें, मास्तरांच्या खुर्चीवर खाजकुयल्या पेरणें, अथवा तिचा एक पाय बेमालूम निखळून काढणें, इतिहासाच्या पुस्तकांतील एलिझा-

बेथला मिशा व वॉरन हेस्टिंग्जला गंध लावणें, इत्यादि अधिक उपयुक्त उद्योगांत जर बालचमू मग्न नसता, व तो आहे त्यापेक्षां जर अधिक साक्षर व पुस्तकप्रिय असता, तर लेखक व कवींनी आपल्या विरुद्ध करून ठेवलेल्या बदनामीकारक कारवायांविषयीं त्यांनी ह्या काटकुळ्या व मूर्ख जातीचे केव्हांच बारा वाजविले असते.

"निरागस", "निष्पाप", "निर्मळ" "निर्मत्सरी", "स्वर्गीय", इत्यादि दैदीप्यमान विशेषणांची बाळलेणीं मूलमंडळींच्या अंगाखांद्यांवर चढवून त्यांचा चिमणा जीव निष्कारण गुदमरून टाकण्यांत आला आहे. विशेषणांची नादमय नक्कारघंटाच वाजवायची असेल, तर "निर्लज्ज", "निस्संग", "निपटारा", निकामी", "निमकहराम" इ. वास्तववादी उपपदांच्या तटिकाजळानेंच त्यांचें तोंड रंगविणें अधिक योग्य ठरेल. कारण अमर लोकांतहि नव्हे, तर केवळ अमरकोषांतच सांपडणाऱ्या ह्या स्वर्गीय गुणविशेषांचा आणि बालचमूंचा काव्यकल्पनेपलीकडे इतरत्र कोठे काडीचाही संबंध नाहीं.

" रम्य तें बालपण देई देवा फिरूनी " ह्या ओळी केवळ विसरभोळ्या वयस्कतेचा गलथान भाबडेपणा दर्शवितात. ओलसर दुपट्यावर निरुपायाच्या संतापानें हातपाय झाडत पडलेल्या, केवळ कार्यमग्न मातृदेवतेची तशी इच्छा आहे म्हणून, आढें व जमीन ह्यांची दर क्षणास भेट घेत झोके खाणाऱ्या, जगाकडे क्षणभर टक लावून पाहाण्याची इच्छा असतां येत्याजात्याकडून दपटून थोपटले जाणाऱ्या व भलभलत्या हौशी गळ्यांतून निघणाऱ्या अंगाई संगीताच्या धांस्तीनें अखेर मूर्छामय निद्रासमाधींत मग्न होणाऱ्या बाळपणांत कांहीं अलौकिक आकर्षकता आहे असें मलाच काय, पण त्या अज्ञ, निरागस, व निर्व्याज बालकांनाही वाटत नाहीं.

दररोज सूर्यास्त पाहाणाऱ्या टीचभर नाझी जर्मनीला कधीहि सूर्यास्त न पाहाणाऱ्या ब्रिटिश साम्राज्याचा जेवढा मत्सर वाटत नसेल, तेवढा मत्सर व राग बालपणाला मोठेपणाविषयीं वाटत असतो. " मी मोठा झाल्यावर—" " मी मोठा होईन " हेंच त्यांच्या असंतुष्ट आयुष्याचें मिसरूड फुटेपर्यंत पालुपद असतें. लहान मुलांच्या तोंडावर पासोड्या घालून आणि त्यांना "लवकर निजे, लवकर उठे" चें पुष्टितुष्टि-दायक तत्वज्ञान सांगून मोठीं माणसें जेव्हां नाटकसिनेमासाठीं पसार होतात, तेव्हा आथरुणांत आंग घुसळत पडलेल्या त्या लहानग्यांच्या हृद-यांत सैतानी भावनांचा कल्लोळ माजतो. हितकर्त्यांचा राग करावा—हा स्वर्गीय बालपणाचा एक स्मरणीय विशेष आहे. मळकट केसांना आणि फुटलेल्या गुढग्यांना शिकेकाई व साबण चोळणाऱ्या हातांचा कडकडून चावा घ्यावा, किंवा त्या हाताच्या मालकाला लाथा मारून त्याच्या तोंडावर थुंकावें हा कृतज्ञ बालकांचा एक दैनंदिन खेळ आहे.

माझ्या माहितींतलें एक बालक आपल्या हृदयाची अव्याज कोमलता अनेक प्रत्ययोत्पादक पुराव्यांनीं सारखी सिद्ध करीत असतें. मासिक पांच रुपये मूल्यांत त्या बालकाची बौद्धिक पातळी वाढविण्याचें प्रचंड कार्य एका गरजू मराठी मास्तरानें आपल्या असमर्थ अंगावर घेतलें आहे. परंतु बापकमाईचे पांच रुपये त्या आधुनिक सांदिपनीच्या मुळींच अंगी लागूं द्यावयाचे नाहींत, असा त्याच्या शिष्यवराचा बाणा आहे. मास्तराची पाठ वळतांच त्याच्या कोटावर झरणींतील शाई उडवून तो प्रथम रंगपंचमी साजरी करतो. नंतर चोखण्यासाठीं म्हणून तोंडांत धरलेली करंगळी झट्कन् पुढें करून तें पोर बाहेर पसार होतें, व दाराशीं पडलेल्या मास्तराच्या वहाणेचा एखादा बंद जायबंदी करून परत जागेवर येतें. घरच्या वात्रट गड्यास हळूंच खूण करून मास्तराच्या पाठीवर " Kick Me " चा कागद चिकटविणें हा त्याच्या धमाल कार्यक्रमाचा पुढील



मास्तरांच्या कोटावर रंगपंचमी साजरी करतो.

भाग असतो. ह्या खेरीज, त्या गुरुवर्यांच्या सायकलसीटला ओलें व्हार्निश फांसून ठेवणें, त्यांच्या आगमन मार्गांवर केळयांच्या साली पेरणें, रस्त्यावर लोळून आलेल्या मोत्या कुत्र्यास मास्तराच्या पोटावर पाय ठेवून चुंबनपूर्वक त्याचें तोंड पुसण्याविषयीं खूण करणें, इत्यादि बाळ-लीलांनीं हें पोर आपल्या घोडदौडीनें विकसित झालेल्या बुद्धीची साक्ष देत असतें. मोरपिसास हळदकुंकू वहाणें, सिनेमाच्या जाहिराती जमविणें, इतिहासाच्या पुस्तकांतील व्हिक्टोरिया राणीचें शुद्धीकरण करून तिच्या चित्रास कुंकू लावणें, असल्या मवाळ उद्योगांवर ह्या बालवीराचा मुळींच विश्वास नाहीं. त्या ऐवजीं फुल-पांखरांचे पंख उपटणें, पक्ष्याचे खोपे उपसून काढणें, कुत्र्याच्या शेपटीस फटाक्यांची लड बांधून त्यास केंकाटत पाठविणें, कांच सामानाचे तुकडे करणें, बाहुल्यांचीं मुंडकीं मोडणें, इत्यादि मर्दानी व जहाल उद्योगच तो फार पसंद करतो. ॲटीला,

चेंगिझ, तैमूर इत्यादि नरवीरांच्या बालपणांत सहज शोभून दिसतील असे त्याचे पराक्रम पाहून बालकांवरील हलुवारतेचा आरोप बालंबाल खोटा असल्याविषयीं माझी निश्चिती पटली आहे व ह्या ( दुर्दैवी !! ) देशाच्या भविष्याविषयीं बराच भरंवसा उत्पन्न झाला आहे.

मी पाहिलेल्या आणखी एका मुलाला दुसराच नाद आहे. सर्व–सामान्य बालकांचें शिवीशास्त्राचें अध्ययनच कितीतरी सखोल नवनवो–न्मेषशाली व मूलगामी असते; परंतु ह्या मुलानें त्या शास्त्रांत केलेली प्रगति स्तंभित करणारी आहे. केवळ व्यंगार्थी शिव्या (जसे, नकटा, चपटा,) केवळ गुणसंकीर्तनात्मक शिव्या ( जसे पाजी, चोर, हरामखोर, ) अशा वर्गवारीनें आपल्या व्यासंगास सुरुवात करून त्यानें अल्पवयातच दोनपात्री शिव्या, तीनपात्री शिव्या, सामासिक शिव्या, वंशसातत्यविषयक शिव्या, विशिष्ट आसनादर्शक शिव्या इत्यादि अनेक शास्त्राचें संपूर्ण आलोडन करून टाकलें आहे. बटबटीत डोळयांचा, काळया वर्णाचा, खुज्या बांध्याचा आणि फक्त आठ वर्षांचा हा मुलगा सहज एखाद्याचें दार लोटून आंत येतो. त्याच्या चेहऱ्यावर मख्ख गांभीर्य मूर्तिमंत विलसत असते. त्याच्या मडक्याएवढया डोक्यांत विचार मावत नसावेत असें त्याच्या आविर्भावावरून वाटतें. तुमचें दार लोटून त्याच्या वयास न शोभेल इतक्या प्रगल्भ स्वरात तो तुम्हास हांका मारतो—

"अहो ! अहो ! "

" काय बाळ, " वत्सलतेचा अतिरेक करून तुम्ही विचारता.

" तुम्ही हरामखोर आहांत ! तुम्ही साल्या आहांत. "

आपला सारा मख्खपणा क्षणांत झुगारून देऊन विजेच्या वेगानें दाराकडे धांवत तें चड्डीतलें पोर तुम्हांस सांगतें. तुम्ही क्षणभर बेशुद्ध होतां. तुम्ही शुद्धीवर येण्यापूर्वीच तें पोर तुम्हाला दारांतून जीभ दाखवीत पुन्हां एकदां बजावते,

"तुम्ही हरामखोर आहांत ! तुम्ही पाजी आहांत ! तुमचें नाक नकटें आहे !" स्वतःविषयींची ही नवीन माहिती न पेलल्यामुळें काठी घेऊन पिसाळल्यासारखें तुम्ही धावत सुटतां, पण एक तर तुम्ही मध्येंच अडखळून पडतां, किंवा धावण्याच्या विषयांतील आपली कमजोरी तुमच्या लक्षांत येते अथवा "पोराच्या नादीं न लागण्याविषयीं" कुणी तरी तुम्हालाच दोन गोष्टी सुनावते व तुम्ही थंड पडतां आणि संपादकाचे सर्व अवश्य गुण अंगीं धारण करणारें तें पोर दुसऱ्या भक्ष्याच्या शोधार्थ सहीसलामत निघून जातें !

शिवीशास्त्राचा बाल प्राध्यापक असणाऱ्या ह्याच चिरंजीवांचा



लैंगिकविषयांत मुलांस मज्जाव असूं नये असा प्रांजळ अभिप्राय आहे. आपल्या ज्ञानास संपूर्ण शास्त्रीय स्वरूप देण्यासाठीं त्याच्याच चाळींत

शहाणाऱ्या एका वैद्यकीय विद्यार्थ्याच्या ग्रंथांतील कांहीं चित्रें एकाग्रतेने न्यांहाळण्याचें त्याचें व्रत आहे. रोमांचकारी प्रणयशास्त्राबाबतहि आपलें मन अगदीं खुलें आहे, (open mind) हें दाखवून देण्यासाठीं तो त्या चाळींतील प्रणयी जनांच्या अगदीं मार्गावर असतो. इष्टसिद्धीसाठीं, पडल्यास मान मोडेल अशा रीतीनें खिडकीवर चढणें, फटींतून डोकावणें, बागेंतल्या झुडुपांत दडून बसणें इत्यादि खडतर कर्म तो ज्ञानलालसेचें अपरिहार्य मोल म्हणून कर्तव्यबुद्धीनें करीत असतो. जगांत सर्वत्र कुशल चाललें आहे कीं नाहीं हें पाहण्याच्या दृष्टीनें तो कित्येकदां सॉक्रेटिसच्या प्रश्नोत्तरपद्धतीचा स्वीकार करून प्रभाकरशिवाय चाललेल्या सुशिलेस विचारील, "कां, प्रभाकर कुठें आहे ? तो बागेंत येणार नाहीं का ?"

केव्हा सुशिलेशिवाय अस्वस्थ होऊन इकडे तिकडे येरझारा घालणाऱ्या प्रभाकरास तो सांगेल—

"सुशीला गेली आतांच बाजारात ! तिला आईनं पाठवलं तिच्या !"

त्या परिणतप्रज्ञ बालकाचा कांहीं प्रणयी सट्टेबाज चिठ्ठीचपाटीसाठीं उपयोग करतात तर काहीं त्याला हिंवतापाइतके वचकत असतात. पहिल्या गिऱ्हाईकाकडून मिळणाऱ्या अस्सल कागदपत्राच्या आधारावर हा बालमुनी आपलें ज्ञानभांडार सजवीत असतो.

खाद्यवस्तूंपासून इतर कित्येक लहानसहान चीजा सफाईनें उडवणें हा ज्याच्या हातचा मळ आहे असे कलावंत बालसृष्टींत बहुसंख्येनें सापडतील. पेन्सीली हारणें, गोट्या पणास लावून जिंकणें व हारणें, ह्या त्याच्या निष्पाप द्यूतप्रवृत्ती दाखविणाऱ्या करमणुकी आहेत. वर्गांत मास्तरास निष्कारण करंगुली दाखवून हवाखोरीस जाणें, पोटाच्या अथवा डोक्याच्या व्यथेचें वैद्यक शास्त्रास बुचकळ्यांत पाडणारें कारण सांगून शाळेस अजीबात बुट्टी

देणें, मारामारींत काळानिळा झालेला डोळा मास्तरांच्या पाशवी हल्यानें रंगीत झाला आहे अशी कपोलकथा सागून प्रेमळ पितृदेवास चिथावून देणें व मातृप्रेमास ऊत आणणें, इत्यादि करामती बालकांच्या कल्पनारम्य कथनकौशल्याची ग्वाही देतात. सत्य व असत्य हीं अखेर सापेक्ष असून दोन्ही केवळ कल्पनाच आहेत, फक्त मन शुद्ध पाहिजे ह्या सत्याचा साक्षात्कार जितका लहान मुलांना झाला आहे, तितका तो इतर कुणासहि झालेला नाहीं.

लहान मुलाची जिज्ञासा ही तर एक जगविख्यात आपत्ति आहे, जगांत जर मारण्यासारखी असूनहि अमर असलेली एखादी भयंकर गोष्ट असेल तर ती कारट्यांची प्रत्येक ठिकाणीं प्रश्नचिन्ह टाकत जाण्याची अथक प्रवृत्ती होय. त्यांच्या कोशात स्वल्पविराम नाहीं, अर्धविराम नाहीं, आडवी रेघ नाहीं. पूर्णविराम तर कुठें नाहींच नाहीं. त्यांची सारी वाचाळ दुनिया डोळे विस्फारित करणारीं प्रश्नचिन्हें, आणि जीभ काढणारीं उद्गारचिन्हें ह्यानीं खचून भरली आहे.

भाबडा चेहरा करून लहान मुलांनीं विचारलेल्या कित्येक प्रश्नाचें स्वरूप पाहिलें म्हणजे मोठ्या माणसाची अब्रू घेण्याचा किंवा आपल्या भयंकर विनोदबुद्धीस त्यांच्या अहंमन्य वयस्कतेचा बळी देण्याचा तो एक कुशल डाव असावा असें वाटूं लागते. लहान मुलांची जिज्ञासा पुरी करण्याची बाणीं खाल्ल्यामुळें त्यास वाटेल तशीं अदूरदर्शी व उडाणटप्पू उत्तरें देणाऱ्या बुद्रुकाची जिरविण्यांत लहान मुलाना आसुरी आनंद वाटत असतो. प्रश्नाचा भडिमार करून बेजार करणाऱ्या एका ज्ञानवृद्ध लहान मुलाच्या गळ्यांत एका वयस्क बालकानें युवतीजनांना मिळणारी "चार दिवसांची सुट्टी व काकपक्ष्याचा स्पर्श" ह्याविषयींची कार्यकारणमीमांसा मोठ्या उत्साहानें उतरविली. सहारा वाळवंटांतील तृषितानें शीतपेयाचा प्याला मोठ्या कृतज्ञतेनें रिचवून पूर्ण समाधानाची मुद्रा करावी, तशी मुद्रा त्या ज्ञानपिपासू बालकानें केली. आपल्या कुशल विवरणशक्तीवर तो

बृद्धहि संतुष्ट झाला आणि दुसऱ्याच दिवशीं त्या चतुर मुलानें स्वतःला कावळा शिवला आहे, ह्या सबबीवर घरांतील कोणत्याही जुजबी कामास शिवायचें किंवा शाळेच्या पवित्र महाद्वारांत शिरायचें स्वच्छ नाकारलें !

मोठ्या माणसांशीं हुज्जत घालून वादविवाद करतांना बालकांनीं वापरलेलें तर्कशास्त्रहि अत्यंत नामोहरम करणारें असतें. "इडिपस कॉम्प्लेक्स" ह्या उच्चारावयास कठीण पण समजावयास सोप्या तत्त्वाचा उहापोह फ्राईड नावाच्या आजकाल जास्त प्रसिद्धी पावलेल्या साहेबानें केला आहे. मुलें निरागास अथवा बावळी नसून तीं लहानपणापासूनच चांगली रसिक असतात असें त्याचें लहान मुलाबाबत आदराचें मत आहे. फ्रॉईडसाहेबाच्या ह्या तत्त्वास टेकू देईल असा किस्सा मी नुकताच एका इंग्रजी पुस्तकात ( व नंतर कित्येक मराठी मासिकात ) वांचला.

एका अल्पवयी बालिकेनें आपल्या बापाशीं एक विलक्षण हट्ट धरला. मी लग्न करणार असा प्रतिगामी पण स्त्रीसुलभ हेका ती धरून बसली.

"तूं लग्न करणार.?" त्या मुलीच्या बापानें तिला कौतुकानें पुसलें

"होय" ती मुलगी गाल फुगवून म्हणाली.

"कुणाशीं लग्न करणार तूं ?"

"मी तुमच्या आईशीं लग्न करणार !"

त्या बालिकेंने आपली महत्त्वाकांक्षा जाहीर केली. "माझ्या आईशीं ? कां बरं ?" गुद्दा मारण्याच्या मोहाशीं झुंजत बापानें विचारलें.

"तुम्हीं माझ्या आईशीं लग्न केलें, म्हणून मीहि तुमच्या आईशीं लग्न करणार !"

लहान मुलांच्या तर्कशास्त्रावर उजेडाचे झोत व "इडिपस कॉम्प्लेक्स" वर तिरपी तिरीप ( Sidelight ) टाकणारी ही गोष्ट मुख्यतः स्त्रीपात्रप्रधान आहे म्हणून ती येथें देण्याचें मी धाडस करीत आहे.

वेडावून दाखवणारी, मुजोरी करणारी, अर्वाच्च बोलणारी, फडताळे उघडणारी, पिंजारलेल्या केसांची, पडक्या दांतांची, फुटलेल्या गुढग्यांची बालसेना जेव्हां माझ्या कल्पनेपुढून आरडत ओरडत व दंगा करीत जाते, तेव्हां मला मुलांफुलांचा कसल्याही कारणानें संबंध जोडणें हा धाडसाचा उच्चांक वाटतो. " **आकाशांत फुलें, धरेवरी फुलें, माझ्या घरींही फुलें** " अशी काव्यमय परिस्थिति पैदा होऊन माळयांचा धंदा बुडाला तर त्याला कुणाचाच प्रत्यवाय असणार नाहीं. परंतु फुलें व मुलें ह्यांत एकरूपता पाहाणाऱ्या कवीचा मतलब जर अलंकारिक असेल आणि **आकाशांत मुलें, धरेवरीं मुलें, माझ्या घरींहि मुलें** " असें जर त्याला म्हणावयाचें असेल तर ती केवळ शापवाणी होय. त्यापेक्षां त्यानें स्पष्टच " डुमडुमत डमरू ये, खणखणत शंख ये " म्हणून जगावर रॉकेल ओतावें, व हातांत काडयाची पेटी घ्यावी. कारण " **आकाशांत मुलें, धरेवरीं मुलें, माझ्या घरींहि मुलें** " हीच माझी प्रलयाची कल्पना आहे!



—चित्रा, दिवाळी १९४२.

# नांवें आणि नांवें

परवांच माझ्या एका मित्राकडे मी बारशाच्या जेवणाला गेलों होतों. लहान मुलाविषयीं तसं माझ्या मनांत मुळींच कुतूहल नाहीं. त्याच्या जवळपास फिरण्यापेक्षां मी एखाद्या टाइमबॉंब शेजारी आनंदानी शतपावली करीन. पण खाल्लेल्या मिठाला जागायचं म्हणून मी उगीचच पाळण्याजवळ गेलों आणि चुटक्या वाजवून व बऱ्याच प्रकारचे आवाज काढून माझ्या अन्नदात्याचें मनोरंजन केल्यावर मित्रपत्नीलाहि प्रसन्न करण्यासाठीं सहजच विचारलं, "नाव काय ठेवलं युवराजांचं?" "अनिलकुमार!" दिव्य मातृत्वानं आधींच धन्य झालेली ती बाई त्या काव्यमय नांवाच्या उच्चारानं आणखीनच फुलून म्हणाली. "अरे वा: ! छान छान!" असं कांहीं तरी कर्तव्यबुद्धीनं पुटपुटत आणि खोलीच्या अंधारांत वर्णसादृश्यामुळें लुप्तप्राय झालेल्या अनिलबाळाच्या दिशेनें आणखी कांहीं चुटक्या वाजवीत, मी त्या खोलींतून पसार झालों !

अनिलकुमार अं ? अनिलकुमार ! वाः ! छान धंदा आहे ! ज्याच्या स्वतःच्या नांवात, ज्याच्या बापाच्या नावात आणि ज्याच्या आडनांवांत दणदणीत अक्षरांची आणि जोडाक्षरांची नुसती गर्दी झाली आहे, ज्याचं स्वतःचं नांव बापाच्या नांवापेक्षां आणि ज्याच्या बापाचं नांव आडनांवापेक्षां, चढीनं दणकेबाज आहे, ज्याच्या संपूर्ण नामोच्चा-

राचा परिणाम मशिनगनच्या एखाद्या फैरीसारखा जोरकस होतो, त्या रुद्राजी भास्कर लड्ड्याच्या मुलाची जन्मतःच अशी दशा व्हावी अं ? एका शंभर टक्के मराठा मुलाचं 'अनिलकुमार' असं लचकदार नांव ठेवलं जावं ? त्या बाईचं एक समजा, तिनं खुशाल आपल्या घराण्यांतल्या नांवांवर गडवाभर पाणी ओतलं, पण रुद्राजींना तर कांहीं अक्कल असायला पाहिजे होती कीं नाहीं ! पारदर्शक पातळांवर आणि बंगाली नावावर शिकलेल्या बायकांनीं बहाल व्हावं, हें त्यांच्या कष्टार्जित व पारंपरिक मूर्खपणाला शोभेल असंच असलं, तरी रुद्राजींनी आपल्या नांवाला आपल्या चिरंजीवाच्या नावाचं काजळ फासून घ्यायला सिद्ध व्हावं ह्याचा अर्थ काय ?

मी खरंच सांगतों, तुम्हीं मला काय वाटेल तें म्हणा, आणि तुम्हांला कांहींच सुचत नसेल तर मला बुरसटलेला प्रतिगामीसुद्धां म्हणा, पण रुद्राजीच्या मुलाचं बारसं अनिलकुमार ह्या नांवानें झाल्याचें ऐकून मला त्या कुलदीपकाचें श्राद्ध झाल्यागत दुःख वाटलं. ज्याचं नांव त्रिंबक नाहीं तर दिगंबर किंवा फारच झालें तर प्रभाकर अथवा माधव असायला पाहिजे, त्याला तुम्हीं खुशाल अनिळकुमार म्हणणार ? छेः—छेः ! कोंवळीं कोंवळीं पंखवालीं बंगाली नावें महाराष्ट्रांत वाघणी भरभरून आयात करण्याचा हा नवा धंदा मला बिलकूल पसंत नाहीं ! बंगालच्या मुलायम जातींत जें पिकतं, विकतं, आणि शोभतं, त्याचं कलम महाराष्ट्राच्या दगडी माळरानावर करण्याचं कांहीं एक कारण नाहीं. वंगीय भट्टींतला रसगुल्ला कितीहि गोड किंवा गुलगुलीत असला, तरी कांदा आणि भाकरीची भरड व तिखट परंपरा असणाऱ्या रासवटांना तो रुचायचा, पचायचा किंवा झेपायचा नाहीं.

चांगली वीतभर दाढी असणाऱ्या, जिरेटोप घालणाऱ्या आणि पंजात वेळप्रसंगासाठीं टोंकदार वाघनखें दडविणाऱ्या **शिवाजी महाराजांचं**

नांव " **वसंता** " होतं अशी कल्पना केली, तर तें कसं काय वाटतं ? किंवा डोक्याचा सागरगोटा करणाऱ्या पल्लेदार मिशांच्या आणि उग्र चेहेऱ्याच्या **लोकमान्य टिळकांचं** नांव " **ललितकुमार** " होतं असं गृहित धरलं तर अंगावर कसला तरी काटा येतो कीं नाहीं ? ह्याच हिशेबानं **राणा प्रतापला सुब्रम्हण्यम्**, **रणजितसिंगाला मगनभाई**, **विक्रमादित्याला धोंडोपंत**, आणि **राणी पद्मिनीला ठकूआत्या**, म्हणून संबोधल्यास मानासिक उत्पाताचा मोठा चमत्कारिक प्रत्यय येतो. येवढंच काय, पण **श्रीराम** व **श्रीकृष्ण** ह्यांचे आद्याक्षराची अनुक्रमें R. D. सूर्यवंशी किंवा K. V. यादव अशी तात्रिकदृष्ट्या अचूक मांडणी केल्यासहि बौद्धिक भूकंपाचे भयानक धक्के बसतात. वृंदावन किंवा अयोध्या येथील प्राथमिक पाठशाळेंतील उपस्थिती पुस्तकावर शोभेल अशी **कृष्णाजी वासुदेव यादव** अथवा **रामचंद्र दशरथ सूर्यवंशी** ही नावाची जुळणीहि बऱ्याच मानासिक व्यायामास व वेदनेस कारणीभूत होते.



**ललित कुमार**

ज्या मराठी मुलाचीं नांवं वास्तविक वामन, दत्तू, किंवा नरहरी अशी कांहींतरी असावयाला पाहिजे होती, त्यांचीं नांवं अनिल किंवा बिपीन अशीं तलम प्रतीचीं ठेवलीं तरी त्यांचा रेजा मुळींच लपत नाहीं. उलट तो एका भेसूर उठावानं जास्तच सलू लागतो. ज्याचं नांव वास्तविक भिकाजी असायला पाहिजे होतं त्याचं बारसं तुम्ही महेंद्रकुमार म्हणवून केलंत तरी तुमचा उद्देश सफल होत नाहीं. कारण भिकाजी हे

नांव ठेवल्यामुळें तो मानव प्राणी जितका भिकाजी दिसला नसता तितका तो महेंद्रकुमार ह्या नांवाच्या पार्श्वभूमीवर दिसूं लागतो. त्याच्या कपाळा-वर जरी एका रोमहर्षक नांवाची चिठ्ठी तुम्हीं डकवलीत तरी त्याचे सारे गुण, वाण, त्याचं सारं व्यक्तिमत्व म्हणजे त्यानं आपल्या नांवाविरुद्ध पुकारलेलें एक बंड असतं. तीं सारीं तुम्हांला सारखीं ओरडून सांगूं लागतात कीं–"माझं नांव भिकाजी आहे! माझं नांव भिकाजी आहे! महेंद्रकुमार ही माझ्या अज्ञानावस्थेचा गैरवाजवी फायदा घेऊन माझ्या आईबापानीं केलेली माझी थट्टा आहे! हा मोठ्या नांवाचा नसता भार त्यांनीं माझ्या अंगावर टाकायला नको होता!" खंडू, विष्णू, गोंदू वगैरे साध्यासुध्या आणि वेड्याबगड्या लोकांचे "नाथ" आणि "कुमार" बनवायला माझी जी हरकत आहे, तशीच हरकत (पण जरा जास्त सवडीनें) माझी काशी, गोदू, मैना, शेवंती, इत्यादि भोळयाभाबड्या मराठमोळा यांना जरतारी नांवे देऊन त्यांची निष्कारण विटंबना करण्याविषयीं आहे.



सुहासिनी

व्हिस्कीच्या अनेक बाटल्यांची नशा ज्यांच्या गहिऱ्या आणि मादक डोळ्यांत सामावलेली आहे, अशा विपुल केसांच्या आणि आरक्त

तळव्यांच्या वंगललनांना सुकेशिनि, सुकुमारी, सलीला इत्यादि मखमली नांवें शोभून दिसतील. मृदुला, माणिक, रतन ह्यांसारखी रेशमी व जडावाचीं नांवें खास गुर्जर तन्वंगींसाठींच निर्माण झालेलीं आहेत. **सुबुलक्ष्मी मुथुलक्ष्मी,** इत्यादि मालमत्ता दोन्ही बाजूनें नाकांत चुका मारणाऱ्या आमच्या मद्रकन्यांचीच अगदीं निखालसपणें होय. शामराव कारकुनाला डाह्याभाई म्हणणें जितकें चूक आहे किंवा श्रीनिवासन् ह्या टंकलेखकाला रणजोरसिंग म्हणून संबोधणें जितकें गैरवाजवी आहे, तितकें आमच्या "**शिताकाकूना**" "**पुष्पकुमारी**" म्हणून हिणविणें निष्ठुरतेचें आहे. रामरावच्या बायकोचें नांव "शीताकाकूच" असायला पाहिजे आणि "शीताकाकूं" च्या सौभाग्य स्थानाचें नांव "प्रफुल्लकुमार" असें असून भागायचें नाहीं. ह्या प्रेमळ दंपतीपैकीं कुणाच्याहि नावाशीं काव्यात्मक पोरखेळ करण्यापूर्वीं आपणांस शीताकाकूंच्या हाताला पडलेल्या भेगा, त्यांचा Air Raid Siren सारखा आवाज, त्यांचा पॉलिश उडालेल्या बुटासारखा वर्ण, आणि रामरावचें मळकें धोतर, बटणें तुटलेला कोट, पुढें आलेले दांत, इत्यादि गोष्टी जमेस धरल्या पाहिजेत. नक्षीदार नांवांचे मुकुट त्यांच्या नम्र मस्तकांवर चढविण्यापेक्षा त्यांना सरळ उचलून क्रूसांवर खिळलेलें बरें !



मिस् लतिका

नांवांत कांहीं नाहीं असें म्हणतात. नांवें जर खरोखरच केवळ नामधारी महत्वाचीं असतीं, तर नांव बदलून देणें, नांव बुडाविणें, नांव

चालविणें, नांव ठेवणें इत्यादि क्रियांना जें अटीतटीचें स्वरूप आलें आहे, तसं तें त्यांना आलें नसतें. कशांतच कांहीं अर्थ नसून, जग हें केवळ मायेनें आणि सापेक्षतावादानें पछाडलेलें आहे, ह्या तत्वानुसार नांवांत कांहींएक नसण्याचा संभव आहे. पण जगण्याच्या सोयीसाठीं कशांत तरी कांहींतरी आहे, हें गृहित धरायचें असेल, तर नांवांतहि कांहींतरी आहे हें अमान्य करून चालणार नाहीं. खंडोबल्लाळ, विष्णु कृष्ण चिपळोणकर, विनायक दामोदर सावरकर, अशासारखीं घवघवीत नांवें तोंड भरून उच्चारलीं कीं मला सह्याद्रीच्या अभेद्य उंच आणि तरीहि सांद्र शिखरांची आठवण होते. अनिलकुमार, प्रफुल्लचंद्र, कल्पना असलीं नांवं मला जमिनीवरून उचलून थेट आकाशांत फेंकतात. संग्रामसिंह, पृथ्वीराज, अजितसिंह, हीं नांवं माझ्या डोळ्यांसमोर उसळत्या भाल्यांचें आणि उडवलेल्या मस्तकाचं पीक उभं करतात. खड्गबहादूर, ब्रिजलाल, रूपकुमारी, रामप्यारी, तरणी-कांत, सुंदरन्, बसाप्पा, रमण भाई, मंजुळा धनपतराय किंवा मोटवानी ह्यापैकीं प्रत्येक नांवामुळें माझ्या मनःचक्षूंसमोर एक स्वतंत्र आणि प्राति-निधिक सृष्टी उभी ठाकते. ह्यापैकीं प्रत्येक नांवाला एका विशिष्ट मातीचा स्वभाव आणि सुवास जडलेला आहे. प्रत्येक प्रांताच्या रूपगुणांचं आणि स्वभाव वैशिष्ट्याचें त्यांत अत्यंत वक्तृत्वपूर्ण व मोहक प्रतिबिंब पडलेलं आहे. भारतीय सौंदर्याच्या ह्या विविधतेनंच एक सलग, संपूर्ण आणि एकरूप सुरूपता भारताला अर्पण केली आहे. रामकुमार, रामसिंह, राम-स्वामी, रामैय्या, रामलाल किंवा रामराव ह्या साऱ्यांत सारखाच "राम" आहे. पण त्या रामाचा "अवतार" आणि आविष्कार ही मात्र भिन्नरूप आणि वैशिष्ट्यपूर्ण आहेत !

असेल. हा प्रश्न संस्कारांचा असेल ! पण संस्कार ही वस्तू मी ज्मेस न धरण्याइतकी क्षुल्लक आणि निकामी समजत नाहीं. जॉन धर्माजी किंवा प्रीता फ्रान्सीस ह्या सारखी गंगा जमनी पैदास मला अगदीं पोट धरून हंसवते. मलबार टेकडीला कुणीं " धवलगिरी म्हटलेलें माझ्या अनुभवाला खपायचें नाहीं. आणि रुद्राजी लठ्ठ्याच्या मुलाचें नांव " अनिलकुमार " असणें हें तर मला साफ नापसंत आहे. मर्द महाराष्ट्रांत पैदा झालेल्या एका सानुल्यांवर असला अत्याचार करण्याचा कुणाचाहि अधिकार नाहीं.



फ्रेडरिक मार्च

× × + ×

मला खेद होतो म्हणून मी विचार करतो तेव्हां मला आणखीच खेद होतो. क्षुल्लक आणि फुटकळ वाटणाऱ्या या गोष्टी एका संपूर्ण सत्याच्या अंशभागी आहेत. आणि म्हणून त्या रक्षणीय आहेत. बंगाल्यांत जर कोमल कमळांचा खर्च पडणार असेल तर कुठल्यातरी बोरीबाभळींनीं काट्यांचा शिणगार केलाच पाहिजे. कुणी बाग फुलविणार असेल तर कुणाला तरी कुंपण घातलेंच पाहिजे.

भुईच्या गुणानें कुठें शिशिर नाहीं तर शरद कुमार उत्पन्न होत असले, तर कुठें भास्कर आणि प्रभाकर पैदा झालेच पाहिजेत.

एकेकाळी मराठी बारगिरांनी बंगाल पादाक्रांत केला आणि आतां बंगाली मराठ्यांचें नांवनिशाण पुसून काढायला सरसावले आहेत. अनिल कुमार अं ? अनिलकुमार ! ! तो **भास्करराम कोल्हाटकर** आतां आम्हाला काय म्हणेल ? उभं गंध लावलेला, कानांत बाळ्या लटकावलेला, उंच मानेचा तो नाना फडणवीस आतां आम्हां हेमंतांना आणि सुमंतांना ओळखूं तरी शकेल काय ? **छट् ! सखाराम बापू बोकीलांचं** नांव **सुकुमारचंद्र** असणं जितकं गैरशिस्त तितकंच रुद्राजी भास्कर लहेच्या वंशजांचं नांव अनिल असणं गैरशिस्त आहे. कारण ज्या मातींत तें बाळ जन्मलं तेथें अनिल अरुण किंवा प्रद्योत जन्माला येत नाहींत. जनू, अंतू किंवा दिगू असल्या चिवट जिवट आणि काटक नगांचीच तेथें पैदास होते. महाराष्ट्राच्या कडेकपारीचा आणि दगडा गोट्यांचा असाच स्वभावगुण आहे. त्यांत लाजण्यासारखं कांहीं एक नाहीं. आपल्या स्वभावाची आणि सौंदर्याची परी आणि पायरीच मुळीं ती आहे. मग हातविणीच्या ह्या उबदार दणकट मराठमोळा घोंगडीवर डाकयाच्या मलमलीचा किंवा काश्मीरच्या शालींचा बनावट ठसा मारण्याचा अट्टाहास तरी कुणी कां म्हणून करावा ?

नवा झंकार २१–५–४४

# जगावें कीं मरावें

जगावें कीं मरावें, हाच आज आपणां सार्‍यांसमोर प्रश्न पडला आहे. जगण्यासाठीं आम्हीं मरमर मरत आहोंत आणि मरण्यासाठीं आम्ही जगत आहोंत. लोकसत्तेचा जय व्हावा, स्वातंत्र्याचा जय व्हावा, स्वाधीनतेचा जय व्हावा, समानतेचा जय व्हावा आणि एकसत्तेचा मुडदा पडावा म्हणूनच आम्हीं मरता मरता जगत आहोंत, आणि जगता जगतां मरत आहोंत.

आम्हीं " जहू " खातो तो लोकसत्तेसाठीं खातो आणि आम्ही रांगा धरतो त्या स्वातंत्र्यासाठीं धरतो, सेफ्टी रेझरचें पातें " ब्लॅडेक्स " लाऊन आम्हीं महिनो गणती घासत बसतो, ते हिटलर आणि टोजोचा सफाई गळा कांपण्यासाठीं. पट्टेदार कांठाची तावडी स्टँडर्ड धोतरे आम्हीं गोड मानून घेतो, कारण त्यामुळेंच मानवी समानतेचा लढा अखेर यशस्वी होण्याचा संभव आहे. नाहीं नाहीं त्या गोष्टी आम्हीं आजकाल करूं लागलों आहोत. जुनीं पुस्तकें मोडक्या बाजारांत फुंकून टाकण्याऐवजीं आम्हीं तीं आघाडीवर लढणाऱ्या सैनिकाच्या सोयीसाठीं इमानें इतबारें एखाद्या सार्वजनिक पेटींत जमा करतो. ( आम्हांस नको असलेलें रद्दी वाङ्मय धर्मादाय करून आम्हीं आमच्या शूर शिपाईगड्यांचा केवढा दावा साधन आहोंत, त्याची वास्तविक आम्हांस कल्पनाहि नसते ! )

ज्या सुशिक्षित भारतीय ललनांनी कधीं सख्या नवऱ्यासमोरहि चहाचा गरम पेला धरला नसेल, त्यांना आम्हीं आजकाल स्टेशनच्या फलाटावर आमच्या शूरवीर सैनिकांच्या खिदमतीसाठीं टोळया टोळयांनीं पाठवितो.



'Travel when you Must' ह्या रेल्वे कंपनीच्या अखंड संदेशास मान देण्यासाठीं आम्ही आमचा प्रवासी गाशा कायमचा गुंडाळून ठेवतो. नुकत्याच 'ग्राज्वेट' झालेल्या आमच्या अनेक तरुणांस एखाद्या हपीसांत चिकटावून ठेवण्या ऐवजीं आम्ही त्यास सेनासारंग बनवून खाकी कपड्यांत गुंडाळतो व शक्य तर कुठेंतरी समुद्रपार त्याची रवानगी करतो. "Grow More Food" ह्या राजाज्ञेस मान देण्यासाठीं आम्ही आमची टेनिस व बाडमिंग्टन कोर्टें पार नांगरून टाकून तेथें कृषि व त्यास साजेल अशीं कर्मे करूं लागलों आहोंत. शत्रूना गुपित रहस्यें कळूं नयेत म्हणून आम्ही आमच्या तोंडास कायमची खीळ तर घातलीच आहे, पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे तोंडांत तीळ ठरूं न देणाऱ्या

स्त्रीवर्गानें देखील सरकारी इच्छेस मोठ्या दयावंतपणें मान देऊन आपल्या तोंडाचा सार्वजनिक तोफखाना तूर्तास बंद ठेवला आहे.

( शत्रूच्या दिशेनें फिरवून त्या तोफखान्यास बत्ती दिल्यास युद्ध-प्रयत्नास मोठाच हातभार लागण्या सारखा आहे; हें येथें आम्हीं सुचवूं इच्छितो ! )

स्वातंत्र्य, समता आणि लोकराज्याच्या तत्त्वासाठीं आम्हीं आता, काय करावयाचें बाकी ठेवलें आहे ? ह्या सुंदर तत्त्वासाठीं ( आणि पात्याच्या अभावी ) आम्ही आमच्या दाढ्या वाढविल्या. ह्या तत्त्वासाठीं ( आणि कायद्याच्या धास्तीनें ) आम्ही " आईस्क्रीम " खाणें सोडून दिलें. ह्या तत्त्वासाठीं ( आणि भक्कम पगार. दुसरा वर्ग व गणवेषांचा विचार करून ) आम्ही आमचीं तरूण पोरें पहिल्या, दुसऱ्या, चौथ्या, अशा साऱ्या आघाड्यावर पेरून दिलीं. ह्या तत्त्वांच्या ब्रम्हपदीं नाचतां यावें, म्हणून आम्हीं ताबडा तांदूळ, काळी डाळ व पांढरा गहूं ह्याचे लोखंडी चणे पचविले, ह्या तत्त्वासाठीं आम्ही जागजागीं रांगा धरल्या, काळ्या बाजाराचें अनावरण केलें, बेस्ट कंपनीनें केलेल्या गद्यपद्यात्मक कवितासुद्धां वाचल्या ! बस्स ! आता आमची सहनशक्ती अगदीं संपुष्टांत आली ! आम्हांस आतां अशी भीति वाटूं लागली आहे कीं ह्या उच्च तत्त्वासाठीं ह्याच प्रमाणांत जर आम्हीं देह झिजवित राहिलो तर अखेर जगांत केवळ तीं तत्त्वें काय ती शिल्लक राहतील आणि आम्हीं मात्र तीं तत्त्वें अमलांत येण्यापूर्वी निकालांत निघालेलें असूं ! पुढील पिढ्यांच्या सोयीसाठीं निष्कारण धारातीर्थी पतन पावण्याची आमची खरोखरच इच्छा नाहीं ! आम्ही जिवंत आहोत तोपर्यंतच आमच्या अडचणी नाहींशा झाल्या, तर त्यांत कांहीं अर्थ आहे, आम्हीं "गेल्यामुळें"

आमच्या अडचणी संपल्या, तर तो तसला अडचणींचा शेवट आम्हांस संमत नाहीं !

आज आमच्या उपटसुंभ अडचणी अनंत आहेत. व मोठ्या तत्वांचें नाव सांगून त्या आम्हांस एखाद्या कोऱ्या जोडयाप्रमाणें सारख्या डसत आहेत. आज आम्हांला जगणेंहि कठीण झालें आहे आणि मरणेंहि कठीण झालें आहे. आम्हीं आतां अशा भयंकर मनःस्थितींत आहोंत कीं सेफ्टी वस्तऱ्याच्या एखाद्या चांगल्याशा पात्यासाठीं आम्हीं खुशाल भारतीय स्वातंत्र्याची भाषा कायमची सोडून देऊं ! अस्सल गव्हाच्या एखाद्या चांगल्याशा चपातीसाठीं आम्हीं समतेची गर्जना अनंतकाळासाठीं गिळून टाकूं ! जी. आय. पी. च्या तिसऱ्या वर्गाचें तिकीट आम्हास विनाआयास मिळत असेल, तर आमची स्वर्गातील राखीव जागा आम्ही अर्ध्या दरात फूटपाथवर विकून टाकूं !

साबण, कापड, बटाटे, कपबशा, केरसुण्या, टाचण्या ह्याच्या मोबदल्यांत आम्हीं तुम्हीं सांगाल त्या उच्च भावनेचा खुशाल सौदा करून टाकूं! आम्हीं इंग्रज सरकारास निक्षून सांगतो कीं, स्वातंत्र्य, मातृभूमि, स्वाधीनता, समता, इत्यादि शब्दाचा उच्चार ह्यापुढें आम्हीं कधींहि करणार नाही व माउली, आपणहि तो करूं नये.

आता आमच्या मागण्या अत्यंत नम्र स्वरूपाच्या आहेत. पांचशें पंचावन्न सिगारेट आपल्या हिरव्या आवरणांत पुन्हां बाजारांत दिसूं लागावी व त्याची किंमत एक रुपया आठ आणे येवढीच असावी. क्रीम क्रॅकर बिस्कुटे चघळतांना आपण सव्वा अठरा रुपये किंमतीचे सोन्याचे



तुकडे चावत आहोत असा भास होऊं नये, आमच्या मेजावरील मारेली पंखा ही एक दहा रुपये किंमतीची उष्णकटिबंधांतील अवश्यंभावी सुख सोय असावी, तें १२५ रुपये किंमतीचें मूल्यवान सुदर्शन असूं नये, कामगार वर्गाच्या बिचबंद बिड्या पुन्हा पैशास दहा ह्या हिशेबानें आपल्या ग्राहकांच्या भेटीस याव्यात, आमच्या मसाल्यात पुन्हा अस्सल दालचिनीचा सुवास घुमूं लागावा, जाड्याभरड्या कपड्यांत दडलेलें स्त्रीसौंदर्य पुन्हा एक रुपया वार किमतीच्या जार्जेटमध्यें प्रकट व्हावें, ह्या व अशा सारख्याच आमच्या नेमस्त मागण्या आहेत.

स्वातंत्र्य, समता, बंधुत्व इत्यादि वस्तूशिवाय आमचें केव्हांहि अडलें नव्हतें. पण आज आमचे कोळसे व केरोसीन ह्यांचेशिवाय खरोखर अडले आहे. आम्हास पारतंत्र्य चालेल, विषमता खपेल, पराधीनता परवडेल, पण एखाद्या टाचणीसारख्या टोंचणाऱ्या ह्या युद्धजन्य अडचणी मात्र आतां असह्य झाल्या आहेत. आणि म्हणून आज आम्हांस डेन्मार्कचा युवराज हॅम्लेट ह्याचे प्रमाणेंच जगावें कीं मरावें, असा प्रश्न पडला आहे!

—नवा झंकार २८ मे ४४

# नव-साहित्य दीपिका

गेल्या कांहीं वर्षांत आपल्या जीवनांत मोठी क्रांति घडून आली. 'डाल्डा वनस्पति', भुकटी दुधाचा चहा, 'जहूं'च्या चपात्या व घासलेटसाठीं लागलेल्या रांगा ह्यांपैकीं एकाची तरी माहिती आपल्या प्रतिगामी पूर्वजांस होती काय? आपल्या जीवनांत ज्या अर्थी क्रांति घडून आली, त्या अर्थी आपल्या वाङ्मयांतहि उलथापालथ झाली, हें सांगणें नलगे. आपलें जिवन व आपलें वाङ्मय, तसेंच आपलें जीवन व आपल्या ललित--वाङ्मयातील पात्रांचें जीवन ह्यांचे संबंध प्रसिद्धच आहेत !

आपण जेव्हां तिसऱ्या वर्गांत धक्के खातों तेव्हां आपल्या कादंबऱ्यांतले भाग्यशाली नायक आपल्या ( म्हणजे त्यांच्या ) नवपरिणीत वधूसमवेत दुसऱ्या वर्गातून मधुचंद्राच्या प्रवासास निघालेले असतात. एखाद्या मोटार--अपघातात हातापायांची मोडतोड येवढेंच जेव्हा आपणासाठीं निष्पन्न होतें, तेव्हां तसल्याच अपघातांतून कादंबरीचा नायक मात्र एखाद्या फटाकडीसमवेत दोहोंचे चार हात करण्याच्या सिद्धतेनें साख-सुरत बाहेर पडलेला आपण पहातों. हपिसांत जो डॉगसनसाहेब आपल्या अंगावर वसकन धांवून आपणास खाऊं कीं गिळूं असें करतो तोच कथानायकावर मात्र...

पण आतां साहेबांची कारकीर्द संपलेली आहे. काळ पालटला आहे. आपण पालटलों आहोंत. वाङ्मय पालटलें आहे. ह्या सुप्रसंगीं आपल्या ललित–वाङ्मयांतील प्रमाथी पण पुरोगामी प्रवाहांचें सम्यक् सिंहावलोकन व तौलनिक तपासणी करणें खचित अप्रस्तुत ठरणार नाहीं. अशी तपासणी बोधप्रद व मनोरंजक, व बोधप्रद नच ठरल्यास निदान मनोरंजक तरी ठरण्याचा बराच संभव वाटतो. प्रास्ताविक ( स्थलाभावास्तव ) आटपतें घेऊन वाङ्मय–विहंगमावलोकनाच्या प्रत्यक्ष कामास आतां आपण एकदम प्रारंभ करूं:—

बाह्यांग: ( बायका ):—‘एक नूर आदमी दस नूर कपडा’ हा न्याय आम्ही इतका पुरेपुर ओळखला आहे कीं पुस्तकाच्या अंतरंगापेक्षां बाह्यागावरच आमचा कटाक्ष असतो. सुंदर साडी, चोळी, ओष्ठशलाका, भुकटी इत्यादि मालमसाला उभा केला कीं त्या मसाल्यास आधारभूत असणाऱ्या अव्वल स्त्री–सौंदर्याची महती आता आम्हांस फारशी वाटत नाही. बाह्यागाची साडी सुंदर पाहिजे, मग त्या साडींत एखाद्या कळसुत्री बाहुलीची लांकडी हालचाल लपलेली असल्यास चिंता नाहीं.

हरिभाऊ आपट्याच्या त्या फूटभर लांबीच्या व सहा इंच जाडीच्या कादंबऱ्याचें बाह्यांग पहा, व आमच्या कोणत्याहि आधुनिक ललितकृतींचें बाह्यांग पहा ! ह्या विषयांत आम्हीं आश्चर्यकारक, अफलातून व आटोकाट प्रगति केलेली आढळेल. आधुनिक वाङ्मयाच्या अंतरंगांत स्त्रीशिवाय अक्षरशः पान हलत नाहीं ह्यात नवलच नाहीं. तसें म्हणाल तर आपटे आदींनींहि स्त्रीभूमिकाप्रमुख वाङ्मय बरेंच निर्माण केलें आहे व स्त्रियाविषयीं त्यास कळकळ वाटत असे, असें मानण्यासहि बरीच जागा आहे. पण आपट्यांची पददलित स्त्रीजातीविषयींची आस्था व आपुलकी आम्हा आधुनिकांच्या तुलनेंत उणीच ठरेल. आपट्यांनीं आपल्या

कादंबऱ्यांतून स्त्रियांचीं शब्दचित्रें काढलीं. पण कादंबऱ्यात स्त्रियांचीं चित्रें काढण्यापेक्षांहि कादंबऱ्यांवर स्त्रियांचीं चित्रें काढविणें किती महत्त्वाचें आहे, हें जरीकाठाचा फेटा, बंद गळ्याचा कोट व जाडेभरडें घब्याळ वापरणाऱ्या त्या पुरातन लेखकास कळलें नाहीं हें मोठ्या कष्टानें नमूद केलें पाहिजे. स्त्री-वर्गाविषयींची आमची आत्मीयता व सहानुभूति आता इतक्या परा-कोटीला गेली आहे कीं कादंबरीच काय, पण पदार्थविज्ञानशास्त्राच्या, अध्यात्माच्या, खगोलाच्या वा भूगोलाच्या पुस्तकावरहि एखाद्या लडिवाळ तरुणीचें तिरंगी चित्र प्रथमदर्शनींच ठोकून दिल्याशिवाय आम्हास, आमच्या वाचकास व आमच्या प्रकाशकास चैन पडत नाहीं. स्त्रियाना मान मिळावा म्हणून आगरकरांनीं केलेला कंठशोष आज अपेक्षेबाहेर फळास आला आहे. पुस्तकाच्या अंतरंगाला आतां कुणी विचारीत नाहीं, जो कांहीं भाव आहे तो रंगीत थाटात दाराशींच उभ्या असलेल्या स्त्रीप्रतिमेला !

बाईच्या चित्राचा परवाना पाहून-दाखवूनच मग पुस्तकाच्या अंतरंगांतील फेरफटक्याचा विचार केला जातो. आमच्या प्रका-शकांचें ह्या विषयांत असें ठासून सागणें आहे कीं, वेष्टनावर तरुण बाईचें फक्कडसें चित्र दिल्यावर आतील सर्व पानें कोरीं असलीं तरी आमच्या वाचकास त्याचें सोयरसुतक वाटणार नाहीं ! नाहींतरी पुस्तकांत वाचकाला काय सांपडायचें आहे ? वेष्टनावरचें चित्र हाच खरा मुद्देमाल ! तेवढाच काय तो आजचा पुढारलेला वाचक काळजीपूर्वक तपासून घेतो. पुस्तकांतील लिखाणांपेक्षां वाचक-प्रकाशकांनीं पुस्तकावरील स्त्री-चित्रा-विषयीं अधिक जपून असावें, ही गोष्ट आमच्या लेखकास फारशी अभि-मानास्पद नसली, तरी युवतीवर्गाकडे पाहण्याच्या दृष्टिकोनांत आम्ही जो स्पृहणीय पालट केला आहे त्याची निदर्शक ती निश्चितच होय.

स्त्रियांचे प्रश्न कादंबरीकारांनीं सोडवावे असा एक काळ होता. आतां स्त्रियांनींच कादंबरीकारांचे प्रश्न सोडवावे असा काळ आला आहे, ही प्रगति लहानसामान्य नव्हे ! कादंबऱ्यांतून व घरांतून आजवर उंबरठ्या-आड राखलेल्या स्त्रियाना आतां आमचीं मासिकें व पुस्तकें उंबरठ्यावरच्या जिवतीप्रमाणें दर्शनी नमनासाठीं आग्रहानें अग्रभागीं मांडतात हा 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते' त्या 'मनोरंजन' कालीन घोषवाक्याचा केवढा विजय आहे बरें ? प्रतिगामी हिंदु समाजानें आजवर स्त्रियाची जी कांहीं कुचंबणा केली असेल, तिची सव्याज साहित्यिक भरपाई आतां होत आहे, हें पाहून स्वर्गांत आद्य सुधारक खचित आनंदाश्रू ढाळत असतील. साहित्यिक सजावटीच्या विषयात स्त्रीजातीला तिचें स्थान दिलें गेलें आहे एवढेंच नव्हे, तर तो प्रांत सर्वस्वी तिच्याच स्वाधीन करण्यात आला आहे. पिळणूक करणाऱ्या पुरुषवर्गाला तेथें मुळींच थारा नाहीं !

ह्यावर कांहीं बुरसटलेल्या वृत्तीच्या अरसिक जीवाचा असा आक्षेप आहे कीं, वेष्टनावर दरोबस्त स्त्रियांचीं चित्रें काढणें व स्त्रीरूपाचें साहित्यिक भांडवल करणें म्हणजे मातृजातीला मोल लाऊन तिला वाङ्मयीन हाटात बसविणेंच होय. वेष्टनाकडे पाहण्याचा आमचा जो कांहीं दृष्टिकोन आहे, तोच जर प्रातिनिधिक पुरोगामी दृष्टिकोन असेल तर आमची स्त्रियाकडे पाहण्याची दृष्टि कधीं नव्हती इतकी हीन बनली आहे असेंच म्हटलें पाहिजे. स्त्री ही केवळ एक किमानपक्ष नेत्रसुख देणारी उपभोग्य वस्तू आहे, असेंच आता आम्हास वाटतें. स्त्रीकडे उपचारासाठी तरी मर्यादेच्या आदरानें पाहण्याचा सनातनी संकोचहि आतां आम्हीं सोडून दिला आहे, हाच निष्कर्ष आमच्या साहित्यिक सजावटीवरून निघतो. असे हे मधून-मधून ऐकूं येणारे प्रति-क्रांतिकारक स्वरूपाचे आक्षेप आमचीं प्रगतिपथावर वेगानें पडणारीं पावलें अडविण्यास समर्थ झालेले नाहींत, हाच नव-

विचाराच्या सामर्थ्याचा प्रत्ययोत्पादक पुरावा होय. दडपलेल्या स्त्रीवर्गा-वरील इतर सर्व बंधनें तर आम्हीं नष्ट करीतच आहोंत, पण स्त्री-चित्रांतून वस्त्रप्रावर्णाचीं बंधनेंदेखील हळूहळू सैल करून नामशेष करण्याचा आमचा उपक्रम आहे. ह्या विषयांत खरोखरच आपटे, आगरकर आदींनीं माना खालीं घालाव्या अशा प्रतीची प्रगति आम्हीं केलेली आहे, हें नमूद करण्यास आनंद वाटतो. उलटपक्षीं पुष्कळदां शंका अशी येते कीं आपटे–आगरकर हे छुपे स्त्रीद्वेष्टे तर नव्हते ! आगरकरांच्या



छप्परदार मिशा, ती पगडी, व आपट्यांचें तें उभें गंध, तो जरीकांठाचा रुमाल व तो बंद गळयाचा कोट, इत्यादि सनातन सामुग्री आमच्या ह्या शंकेस अधिकच बळकटी आणते. मुखपृष्ठावर स्त्रीचें चित्र दिल्या-शिवाय आपट्यांनीं आपल्या कादंबऱ्या प्रसिद्ध कराव्या व तेव्हांच्या वाच-कांनीं त्या डोळे मिटून विकत घ्याव्यात ह्याचा अर्थ काय होतो ! स्त्रियां-

विषयीं प्रेम, आपुलकी आत्मीय भावना त्या काळीं केवळ नाममात्रच होती असा निष्कर्ष, त्यावेळच्या पुस्तकांचीं न पाहण्यासारखीं बाह्यांगें पाहिल्यावर आमच्यानें काढल्याविना राहवत नाहीं. आतां मात्र स्त्रियांचीं चित्रें शिरोधार्य मानणारे दिन-दर्शिकावाले, सुवासिक तेलाचे व अंगरागाचे वितरक, बांगड्यांचे व भांड्यांचे विज्ञापक, ह्यांच्याइतकाच परमादर स्त्रियांविषयीं प्रकाशकांत, ग्रंथकारांत व वाचकांतहि प्रसृत झाला आहे. कालिदास, भवभूति, बाणभट्ट, आपटे आदि मंडळी पुनश्च अवतरली तर ग्रंथाऐवजीं वेष्टनाचा विचार त्याना प्रथम करावा लागेल. शकुंतलेच्या नुसत्या शब्दचित्रावर हुरळून जाण्याइतका आजचा वाचक मूर्ख राहिलेला नाहीं. चौकटींत बसवून त्यास वारंवार पाहतां येईल असें बाईचें तिरंगी चित्र मिळण्याची व्यवस्था आता प्रथमच झाली नसली, तर चारदोन रुपयाचें पुस्तक त्याच्या माथीं मारणें प्रत्यक्ष कालिदासालाहि शक्य नाहीं ! युवतीचें सामर्थ्य, आकर्षण, अधिकार व उपयुक्तता, ह्यांची ' वास्तववादी ' जाणीव आजच्याएवढी अन्य कोणत्याहि साहित्यिक कालखंडात झाली नव्हती, असें आधुनिक सारस्वताच्या वतीनें आम्हास मोठ्या अभिमानपूर्वक सांगितलें पाहिजे ! बाह्यांगासारख्या अनन्यसाधारण महत्त्वाच्या विषयाची आस्था दिनेदिने अधिकाधिक वाढतच आहे, हें आम्हास आमच्या वाङ्मयीन आरोग्याचें मोठें स्फूर्तिदायक गमक वाटतें !

**अंतरंगः**—( बायका ) बायका म्हणजे तरुण बायका एवढेंच नव्हे, तर बायका म्हणजे शक्य तोंवर तरुण, सुंदर बायका हें आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. तारुण्य व सौंदर्य ह्याविना स्त्रीत्वाची अन्य ओळख ठेवणें आतां कोणास आवश्यक वाटत नाहीं, हा आधुनिक युगांतील सौंदर्यबुद्धिचा मोठाच विजय होय. कुंदकळ्यांसारखे दांत, हरिणीसारखे डोळे, केतकीसारखा वर्ण, चंद्रासारखा चेहरा, हें कादंबरी-नायिकांचें लोकप्रिय

वर्णन होतें. आतां इतक्या इरसाल सुंदर नायिका रंगवितांना स्त्रीसृष्टींतलि भयानक वस्तुस्थितीचा वाढता संकोच बाळगणाऱ्या कांहीं लेखकांना मोठाच पेंच पडतो.

म्हणून आजच्या कादंबरींतील नायिका ही सहसा " एकदम सुंदर " नसते. पण ती " सावळी असली तरी मोहक " " नकटी असली तरी आकर्षक ", " नितांतसुंदर नसली तरी मादक " किंवा " रूपानें सामान्य असली तरी स्फूर्तिदायक " अशी कांहीं तरी अवश्य असते.

पूर्वकालीन नायिकांच्या रूपांत कुठें तीळ उणा ठेवावयास लेखक राजी नसे, तर आता तिच्या आकर्षणाचा प्रभाव खुषीनें वाढविण्यासाठीं कुठेंतरी एखादा उणा तीळ ठेवून देण्याची लेखक काळजी घेतो.

पूर्वीच्या नायिका सामान्यतः नम्र, भुई नखानें उकरणाऱ्या, दृष्टी खालीं ठेवणाऱ्या, " पतीच्या अर्ध्या वचनात " वागणाऱ्या, "इश्य गडे कुणी पाहील " असें म्हणून प्रियकरानें जादा लगट करताच सटकणाऱ्या, व नुकतेंच " चवदावें सरून पंधरावें, " अथवा फारच तर " पंधरावें सरून सोळावें " लागलेल्या अशा असत. आता " सव्वीसावें सरून सत्तावीसावें " वा " चवतीसावें सरून पसतीसावें " लागलेल्या नायिकाहि कोणास आश्चर्यचकित करीत नाहींत. उलट पुरुष-वर्गाशीं वा नायकमहाशयाशीं असणारे त्याचे सलगीचे संबंध हे विकारी नसून शुद्ध विचारी स्वरूपाचे आहेत, ह्या त्याच्या विधानास त्याच्या वयोमानाचा विश्वासपात्र आधार सांपडतो.

" माझी ना का आहे ? पण गडे कुणी पाहिल ! " हें प्रतिगामी नायिकांचें लाजाळू वाक्य आतां इतिहासजमा झालें आहे.

आधुनिक प्रेम हें जनताविमुख नसून जनताभिमुख आहे. एकांतांतील चोरटें प्रेम हें आतां निरोगी मानलें जात नाहीं. उलटपक्षीं ह्या विषयांत

आम जनतेस विश्वासांत घेऊन वागण्याचेंच आधुनिकांचें स्तुत्य धोरण आहे. प्रियकर-प्रियकरणीच्या लडिवाळ लगटीस साक्षीदार न सांपडूं देण्यापेक्षां असे साक्षीदार अट्टाहासानें ठेवणें हाच आजचा युगधर्म होय. "पण लक्षांत कोण घेतो" मधली नायिका तिच्या मुंबईतील वास्तव्यात रघुनाथरावांच्या हातांत हात घालून "माँजिनींत" गेली किंवा रघुनाथरावानें कधीं "सण्डहर्स्ट" पुलावर मोकळेपणानें तिचे खांदे घुसळले, वा पुर्तुगीज चर्चच्या चौकांत तिची कंबर लपेटली असें कधीं झालें होतें काय? शरीराची नैसर्गिक भूक निःसंकोच प्रकटतेनें भागविणें हें आपल्यासारख्या तथाकथित



जुना व्हिलन व नवी नायिका

सुधारकांसहि प्रशस्त वाटत नसावें, असें त्यांच्या नायिकांच्या वर्तनावरून निःशंकपणें म्हणतां येईल. ह्या विषयांत आमच्या नायिकांनीं

केलेली प्रगति कौतुकास्पद आहे. जो शृंगार जनतेच्या चोरून होतो तो शृंगारच नव्हे व जें प्रेम साक्षीदार ठेवीत नाहीं तें प्रेमच नव्हे अशी ह्या विषयांत आधुनिकांची धारणा आहे. सार्वजनिक शृंगारांत शृंगाराची मिरासदारी होऊं शकत नाहीं! त्या शृंगाराचा आनंद केवळ त्या दोघांस मिळतो एवढेंच नव्हे, तर बऱ्याच अंशीं जनतेसहि मिळतो. केवळ दोघांनींच चोरून आपल्या प्रेमाचें सुख उपभोगावें, त्यात जनतेस अंशभागी करूं नये, ही शुद्ध मिरासदारीची भांडवली वृत्ति झाली. तिला आतां आमच्या जीवनांत व साहित्यांत स्थान नाहीं! लाजून नखानें भुई वा गालिचा उकरणाऱ्या नायिका आतां आमच्या साहित्यांत औषधालाहि सांपडत नाहींत. नखांचे अन्य उपयोग आतां स्त्रियांस माहित झाले आहेत व लाजण्याचें कामहि नायिकेऐवजीं इतरे-जनच करीत असतात.

आजची नायिका ही लाजणारी नाहीं, ती लाजविणारी आहे. "इश्श गडे कुणी पाहिल!" हें तिचें ब्रीद नव्हे. "नितंब," "उरोज" "टचटचीत कुचाग्रे" आदींच्या सविस्तर शब्ददर्शनांस ती मुळींच बिचकत नाहीं! "प्रदीर्घ चुंबन" व "गाढ आलिंगन" हे तिच्या सहज सरावांतले विषय झाले आहेत. "लगीन होईतों मी आपणास भलतेंसलतें काहीं करूं देणार नाहीं," असें पूर्वींच्या नायिका धडाडीची आगेकूच करूं पाहणाऱ्या नायकास म्हणत. आतां मात्र विवाहपूर्व काळांत नायकानें फाजील संकोच धरल्यास त्याला सदैव विवाहपूर्व काळांतच वास्तव्य करावें लागेल!

लैंगिक गंडाविषयीं अद्यावत नायिकांना मुळींच आदर नाहीं. सह-वासोत्तर विवाहांच्या ह्या काळांत नायक लाजरे निघाले, तर ते नायकत्वास पात्र आहेत हें आधुनिक नायिकेस कळावें तरी कसें!

पूर्वी नायिका साधारणतः लग्न करीत असत, अथवा लग्न झालेल्या असत. लग्न न झालेल्या नायिका इष्ट पुरुषांशीं लग्न करण्यासाठींच साऱ्या कादंबरीभर धडपडत व एकदांचे त्याचे दोहोंचे चार हात ( म्हणजेच " मधुर मीलन " झालें कीं शांतपणें कालक्रमणा करावयास व पाळणें हलवावयास त्यांचा नकार नसे. नायकाचा नायिकेशीं, नायिकेचा नायकाशीं व त्या दोहोंचा एकमेकांशीं विवाह करून झाला, त्यात अडचणी किती आल्या, त्यांची वासलात कशी लागली, हें सांग-णारा इतिहास म्हणजे कादंबरी अशी एकदां स्थिति होती. ज्यांचें आधींच लग्न झालें आहे अशा नायिकाचा वेळ " शंकरमामंजीशीं ", " बाळासाहेबांशीं " किंवा त्यांच्यावर वांकडी दृष्टि ठेवणाऱ्या अशाच एखाद्या खलपुरुषांशीं झुंझण्यांत व त्याचा पाडाव करण्यात वा स्वतःच त्या प्रयत्नांत कामीं येण्यांत निघून जात असे. आजची नायिका लग्नाच्या वा तत्सम कांहीं उद्योगाच्या भानगडीत नसते असें नाहीं, परंतु नुसत्या लग्नानेंच संतुष्ट होण्याइतकी ती आतां संकुचित राहिलेली नाहीं ! क्रांतीच्या मार्गावर तिचीं पावलें पडलेलीं आहेत. एक वेळ ती प्रेम केल्याशिवाय राहील, लग्न केल्याशिवाय राहील पण बंड केल्याविना राहणार नाहीं !

मराठींतील कथानायिकांच्या बंडाचा हा इतिहास खरोखरच मोठा कौतुकास्पद व अभिमानास्पद आहे. प्रेमासाठी नायिका बंड करील असा एक टप्पा होता. तें बंड अर्थात् बापाच्या विरुद्ध उभारलेलें असे. एखादा निषिद्ध प्रकारचा, बापानें गचांडी मारलेला नायक हें त्या बंडाचें कारण असे. प्रेम करण्याचा आधिकार, सौंगडी शोधण्याचा अधिकार, प्रियारा-धनाचा अधिकार प्रस्थापित करण्यासाठीं हें बंड उभारलेलें असे. ह्या बंडाळीनें बापांचा अखेर पूर्ण बीमोड झाला हें सांगावयास नकोच. पण

जागृत युवतीवर्गानें आतां रक्त चाखलेलें होतें. बंडाची आतां तिला चटक लागली होती. बाप निकालांत निघाले तरी बंडखोर वृत्ति मात्र निकालांत निघाली नाहीं.

प्रथम त्या एखाद्या तरुणाशीं विवाहबद्ध होतां यावें म्हणून बापाविरुद्ध बंड करीत; पुढें वैवाहिक आयुष्यांतील कुचंबणा ध्यानात आल्यावर प्रत्यक्ष नवऱ्याविरुद्ध व वैवाहिक आयुष्याविरुद्ध त्यांनीं बंडाचा झेंडा उभारला !

एका अवस्थेंत नायिकांचें बंड लग्नासाठीं होतें व नंतरच्या अवस्थेंत तें लग्नाविरुद्ध होतें. प्रथम तें पित्याविरुद्ध व पतीसाठीं होतें, तर पुढें तें पतीविरुद्ध व प्रियकरासाठीं होऊं लागलें. प्रथम स्वेच्छेनुसार लग्न हें नायिकाचें ब्रीदवाक्य होतें, तर पुढें स्वेच्छेनुसार लग्नाविच्छेद हें घोषवाक्य बनलें.

ह्या क्रांतिकारक बंडखोरीच्या अद्ययावत् दृष्टिकोनातून पाहिल्यावर हरीभाऊ आपट्यांच्या नायिका किती मागासलेल्या होत्या हें नीट ध्यानांत येतें. "पण लक्षांत कोण घेतो ?" मधल्या यमूनें तरुणपणीं नवरा स्वर्गवासी झाला म्हणून झुरून मरणें हें खरोखरच तिच्या हळव्या व पराभूतप्रवण मनोवृत्तीचें द्योतक होय. पुनर्विवाहाच्या सुधारणेचा सुप्रसंग वैधव्याचे मिषानें आपणास लाभला आहे, समाजाच्या (व स्वत:च्या ?) डोळ्यात अंजन घालण्याची ही क्रांतिकारक संधि आहे, येवढेंहि तिला सुचूं नये काय ? किमानपक्ष विधवासाठीं कुंकवाचे करंडे काबीज करण्याची मोहीम उघडावयास तिला कोणता प्रत्यवाय होता ! "मायेच्या बाजारां" तील पद्मेकडूनहि अशीच अक्षम्य आगळिक घडली आहे. बाळासाहेबासारख्या दुर्वृत्त नवऱ्याचा छळ मुकाट सहन करून ही सुशिक्षित तरुणी फुकट मरून गेली. येवढेंच नव्हे तर मरतांनाहि आपल्या नवऱ्याला दरमहा नियमित पैका मिळण्याची व्यवस्था करून ती मेली. ह्या दासी वृत्तीला

आतां काय म्हणावें ? पद्मेची मैत्रीण मालती हिचा भाऊ वसंतराव ह्याविषयीं आधुनिक वाचकाला बऱ्याच आशा वाटतात; पण दुष्ट नवऱ्याच्या नाकावर टिच्चून वसंतरावासमवेत पळून जाण्याचा विचार पद्मेच्या स्वप्नांतहि येत नाहीं. पद्मेचें चित्र अद्ययावत कुंचल्यानें काढावयाचें झाल्यास व्यसनी नवऱ्यासाठीं निष्ठेनें झुरण्याऐवजीं तिच्याविषयीं जिव्हाळा बाळगणाऱ्या वसंतरावाबरोबर ती पळून गेली अथवा प्रस्थापित रूढीविरुद्ध बंडाचा झेंडा उभारून तिनें वसंतरावास अन्यथा कृतकृत्य केलें, असेंच दाखवावें लागेल. मरतां मरतां नवऱ्याच्या पोटापाण्याची चिंता करण्याचें तर पद्मेला कांहींच कारण नव्हतें. उलटपक्षीं वेगळें होऊन तिनेंच बाळासाहेबाजवळून पोटगी मागणें अवश्य होतें. परंतु तसें कांहीं करण्याचें धाडस पद्मेला किंवा हरिभाऊ आपट्यांना मुळींच झालें नाहीं ! "एकच प्याल्यांतील" सिंधूच्या दस्यूवृत्तीविषयीं सर्व जागतिक बुद्धिवाद्यांनीं तीव्र निषेध प्रकट केला, परंतु सिंधूच्या पावलावर पाऊल टाकणाऱ्या पद्मेचा धिक्कार मात्र मुळींच झालेला नाहीं याविषयीं आश्चर्य वाटतें.



पायांतलें हातांत घेईल

परंतु आनंदाची गोष्ट अशी कीं सिंधू, पद्मा, वा तत्सम स्त्रिया आधुनिक ललितवाङ्मयांतून सीमापार झाल्या आहेत. आधुनिक सिंधू, "कशी या त्यजूं पदांला" म्हणून सुधाकराचे पाय धरण्याऐवजीं एक तर (१) पायांतलें हातांत घेईल (२) समान अधिकारांच्या नावानें स्वच्छ पेल्यामागें अर्धा पेला स्वतःच वसूल करील (३) रसकापूराचा वेगळाच उपयोग करून पुनर्विवाहाची वा घटस्फोटाची, वा पुनर्विवाह व घटस्फोट ह्यांची दुहेरी सुधारणा एका फटक्यांत पदरीं पाडील. (४) मद्यपान निषेधपर एवढी पिरपिर करील कीं दारू सोडतों पण पिरपिर नको, म्हणून सुधाकर तिला सपशेल लोटांगण घालील.

ह्यावर कांहीं जुनाट वृत्तीचे लोक असें म्हणतील कीं पद्मा वा सिंधू-सारख्या नायिकांचा आदर्श हा ज्याविरुद्ध आकसानें रान उठवावें अशा प्रतीचा आदर्श निश्चित नव्हे. मैत्री व विवाह ह्या दोहोंचा निष्ठा हा प्राण आहे. सुधाकराच्या चलतीच्या काळांत सिंधूनें त्याची जोडीदारी करावी, व त्याच्या पतनाच्या काळांत काय तिनें त्याला लाथ मारून दुसऱ्या घरठावा-साठीं वृत्तपत्रांत प्रकटन द्यावें ? संकटांच्या वा व्यसनाच्या काळांतहि सिंधूनें आपल्या जन्माच्या साथीदारास सोडूं नये, हीच तिच्या चारित्र्याची व संस्कृतीची खरी थोरवी आहे. जगानें सुधाकराला टाकलें, तेव्हांहि तिनें त्याला टाकलें नाहीं, हा काय तिचा कमीपणा झाला ? मद्यपान–निषेधपर विद्वत्ताप्रचुर व्याख्यानें तिनें त्याला पाजलीं नाहींत, हें खरें. सुधाकराच्या हृदयांतला परमेश्वर जागा व्हावयाचाच,तर तो सिंधूच्या दैदीप्यमान त्यागानें, प्रेमानें व निष्ठेनें झाला असता. नुसत्या व्याख्यानांनीं सुटण्याइतकी दारू सैल असती, तर जगांतले गुत्ते केव्हांच बंद पडावयास पाहिजे होते तिळा-तिळानें आत्मार्पण करत अचल निष्ठेनें पतीच्या उद्धारासाठीं झगडणारी सिंधू, ही स्वतःच व्हिस्कीचा दुहेरी पेग मारून एका निषेधपर

व्याख्यानानें नवऱ्यास निरोप देणाऱ्या नूतन नारीपेक्षां वेगळ्याच कोटींतील स्त्री होय......इत्यादि.

प्रस्तुत विचारसरणी प्रतिगामी व बुरसटलेली आहे येवढें म्हटल्यावर अधिक कांहीं सांगण्याची आवश्यकता नाहीं हें उघड होय. निष्ठा, त्याग, पातिव्रत्य, जन्माचें साहचर्य ह्या जुनाट मूल्याविषयीं आमच्या नूतन नायिकाम मुळींच मोह नाहीं! दारू पिणारा दरिद्री सुधाकर व दारू पिणारा आय. सी. एस्. हपीसर ह्यात आजच्या नायिकांचा व्यवहारी वास्तववाद दुसऱ्यासच स्वयंवराची माळ घालील. त्यांचा कटाक्ष दारू पिण्याविषयीं नसून दरिद्री असण्याविषयीं आहे, त्या परमार्थवादी नसून अर्थवादी आहेत, ह्यातच त्याच्या बडखोर वृत्तींचें सारसर्वस्व आलें! ह्याच नमुन्यावर आमच्या नायिका उत्क्रान्त होत आहेत हें ललित–साहित्याच्या भाग्यशाली भविष्याचें प्रसादचिन्हच होय.

**नायकः**—नायिकेच्या मागें मागें घोटाळणारा, तिच्याशीं लग्न करूं पाहणारा, तिच्या रूपाचीं वर्णनें गाणारा, तिचीं पडतील तीं कामें करणारा, कथानकातील खलपुरुषाशी शक्य तेव्हां मारामारी करणारा व अखेर हमखास यशस्वी होणारा इसम—हें नायकांचें वर्णन आतां पूर्णांशानें लागू नाहीं. पूर्वीच्या नायकाप्रमाणेंच आजचा नायकहि एखाद्या मुलीसाठीं सामान्यतः धडपडत असतो. तो प्रेमहि अर्थात करतो. पण तो नुसतेंच प्रेम करत नाहीं, तर पुष्कळदा प्रेमाबरोबरच तो राजकारण, दलित वर्गाचा उद्धार, संपाचें पुढारीपण, इत्यादि उचापतीहि करीत असतो. नायकांच्या प्रेमविषयक कल्पनाहि आतां विशाल व प्रगत झाल्या आहेत आणि प्रेम करण्याचें त्याचें क्षेत्र व शक्तिहि वाढली आहे. तो स्वतःच्या बायकोशीं लग्न करतो, व अन्य तरुणींवर प्रेम करतो. प्रेम व लग्न ह्यांचा अविभाज्य संबंध तो मुळींच मानत नाहीं. प्रेमाची नग्ना

पुरेशी न वाटल्यानें तो व्हिस्कीहि पीत असतो. कुचंबणा झालेली मित्राची पत्नी, कुठे तरी भेटणारी कोणती तरी पोर, भावजय हे त्याच्या प्रेमास चटकन् पात्र होणारे आपुलकीचे विषय होत. मध्यंतरीं आमच्या कथानायकांत श्यामा वेंगुर्लेकर, सुरंगा म्हापशेकर, ह्यांसारख्या वेश्यापुत्रींशीं लग्न करून त्यांचा उद्धार करण्याची एकच लाट आली होती. तूर्त कथानायकांशीं लग्न करण्यापेक्षां सिनेमांत जाणें, अथवा शांतपणें आपला व्यवसाय करणेंच वेश्याकुमारीस अधिक लाभदायक वाटतें. तत्त्वतः लग्न व व्यवसाय हीं नाहीं तरी एकाच पातळीवर येत असल्याचें त्यांच्याहि ध्यानात आलें असावें !

पूर्वीच्या कादंबऱ्यातून नायकांचें नायकत्त्व अखेरपर्यंत टिकत असे. आतां वैवाहिक आयुष्याची कुचंबणा झालेल्या नायिकेने नायिकाविरुद्ध बंडाचा झेंडा व घटस्फोटाचा दावा मांडताच नायकाचें रूपांतर तत्काळ खलपुरुषात होऊन जाते. अर्थात् कुचंबणेच्या दिवसांत नायिकेशीं संधान बांधून तिला घटस्फोटाची मसलत देणारा खलपुरुषाच्या तोंडावळ्याचा इसम बोल म्हणतां नायकाच्या नैतिक तेजानें तळपूं लागतो !

नायकानें गुणसंपन्न, सुशील व यशस्वी असावें, हा जुन्या काळचा दंडक आतिशय अवास्तव वाटल्यामुळें व्हिस्की, परदाराभिलाषा, बंधनें पार करणारी जागतिक जातीची भ्रमरवृत्ति, मूर्ख व सोदें ( fools & knaves ) ह्यांचें अखेरचें आश्रयस्थान असणारें राजकारण ह्यांतील अनेक सत्तत्त्वांचा उपयोग करून आजचा वास्तववादी नायक घडविला जातो. आजच्या नायिकांचा विचार करतां त्यांस योग्य असाच हा नायक आहे हें कुणीहि मान्य करील.

गुणसंपन्न अथवा चारित्र्यशील नायक निर्माण करणें हें जरी आज वास्तवतावादास विरोधी मानलें जात असलें, तरी नायकांच्या जातीनें सुंदर, देखणें, अथवा किमानपक्ष तरतरीत असणें मात्र फारच आवश्यक आहे. पालटलेल्या मूल्यांच्या ह्या काळांत नायिका रूपांत उणी असल्यास चालेल; पण नायक कुरूप असून कसें भागणार ? "My face is my fortune, sir" हेंच आजच्या बहुतेक नायकांचें धृपद आहे. वेषभूषेविषयीं व वस्त्रप्रावर्णाविषयीं तो फार जपून असतो. चारित्र्यावरील कलंकापेक्षा कपड्यावरील डागामुळें त्यास मरणप्राय दुःख होतें.

नायिकाच्या बंडखोर वृत्तीपासून आमचे नायकहि अर्थात् अलिप्त नाहींत. ज्याच्यासाठीं बंड केलें जातें तो नायक, ज्याच्याविरुद्ध नायिका बंड करते तो नायक, जो नायिकेसाठीं राजकारण करीत करीत कोणाविरुद्ध तरी बंड करतो, कोणाशीं तरी लग्न करतो, कोणावर तरी प्रेम करतो, व स्वतःच्या लग्नांत मानवजातीचें हित, व मानवजातीच्या हितांत स्वतःचें लग्न साधतो तो नायक, अशीच आता नायकाची प्रगत व सर्वंकष व्याख्या करावी लागेल. "And they lived happily ever after." ह्या संकुचित वाक्यांत समारोप करतां येईल इतकें आधुनिक नायक-नायिकाचें जीवन सुलभ, सरळ, व संकीर्ण राहिलेलें नाहीं. तसें तें राहिल्यास अनेक वैवाहिक समस्या उत्पन्नच होणार नाहींत, व त्या सोडविण्याचें सनसनाटी चातुर्य दाखविण्याची सवड लेखकवर्गास उरणार नाहीं !

**खलपुरुषः**—जुन्या कादंबऱ्यांत खलपुरुष हें मोठेंच प्रस्थ होतें. खलपुरुष अस्तित्वांत नसते, तर नायक—नायिकांचीं लग्नें शेवटच्या प्रकरणात लागण्याऐवजीं तीं पहिल्याच प्रकरणांत लागलीं असतीं. एका परीनें खलपुरुष हा नायक-नायिकेचा उपकारकर्ता होता. कारण त्याच्याच कर्तृत्वामुळें नायकाचा पराक्रम, शील, सद्दी व प्रेम ह्यांच्या प्रदर्शनास

बाव मिळत असे. खलपुरुषाची सारी धडपड स्वतःच नायक बनण्यासाठी —म्हणजे नायिकेशीं लग्न लावण्यासाठीं चाललेली असावयाची. खलपुरुष हा कधीं कारस्थानी, दुष्ट, कुरूप, भेकड, विषयी, स्वार्थी, तर कधीं शूर, चतुर, क्रूरकर्मा, मधुभाषी, उलट्या काळजाचा, सुंदर. नायिकेच्या रूपसंपत्तीवर, ऐहिक वैभवावर वा दोहोंवर डोळा ठेवणार असा असावयाचा. कांहीं खलपुरुष इतके कर्तृत्ववान् होऊन गेले, कीं स्त्रियांच्या तर्कशून्य लहरी स्वभावास अनुसरून त्यांनीं निर्णयप्रमादाचे पार्य नायकाशीं लग्न करण्याचें ठरविल्यामुळेच खलपुरुष खलपुरुष राहिला. एरवीं तो नायकच व्हावयाचा! सत् व असत्, चांगलें व वाईट ह्याच्य जुनाट सीमारेषा पुरोगामी वाङ्मयाच्या घोंघावणाऱ्या प्रवाहाने इतक्य पुसटून टाकल्या आहेत कीं आजच्या ललित वाङ्मयात जुन्या चालीच्य खलपुरुषाची फार त्रेधा उडून जाईल.

पुरातन काळीं पतिव्रतेचें सतीत्व हरण करूं पाहणाऱ्य खलपुरुषास नायिका— "तुझे पुढचे पाऊल माझ्या प्रेतावरच पडेल" असें सांगून कधीं परमेश्वराचा, तर कधीं नायकाचा, तर कधीं खलपुरु षाचाच धावा करीत आत्महत्येच्या विचारास लागे. (नायिकेचे "सतीत्व" हरण करणें हा पुरातन खलपुरुषाचा फार मोठा उद्योग असे!) जुनाट वळणाच्या खलपुरुषानें नव्या वळणाच्या नायिकेशीं 'तशा' कांहीं हेतूने आतां प्रसंग घातल्यास पुढील संवाद संभवतो :—

**खलपुरुष**—सुंदरी, मुकाट्यानें तूं मला वश हो! इतक्या दिव- सांनीं आज बरी मला एकटी गवसलीस! हाः हाः!

**नायिका**--एकटें हिंडायची मला संवय आहे!

**खलपुरुष**—कर! परमेश्वराचा धांवा कर. कोणता परमेश्वर तुला आतां वांचवतो, तेंच मी पाहतो. हाः हाः हाः!

**नायिका**—परमेश्वरावर माझा विश्वास नाहीं. तुझ्या मूर्खपणावरच माझा जास्त विश्वास आहे.

**खलपुरुष**—मूर्ख ? मी मूर्ख ? हा : हा : ! आतां क्षणार्धांत तुझ्या पदराला हात घालून जेव्हां मी--

**नायिका**--अरे जा रे ! Nudist club ची मी सदस्य आहें.

**खलपुरुष**—(दचकून) "न्युडिस्ट क्लब" ? म्हणजे...! हाः हाः !

**नायिका**—म्हणजे नग्नसंघ ! त्याची मी सभासद आहें. बोल, काय म्हणणं आहे तुझं ? आणखी हें पहा, बोलतांना घोड्यासारखा खिदळूं नकोस. थुंकी उडते तुझी !

**खलपुरुष**—(गारठत) आँ ? काय म्हणतेस ? माझं तुला भय वाटत नाहीं ? हाः हाः ! थाब ! बळानं तुझं सतीत्व मी नष्ट केल्यावर--

**नायिका**--सतीत्व ही केवळ एक कल्पना आहे ! सतीत्व हें नुसतं शारीरिक नाहीं त्यामुळें तें तुला नष्ट करतां येणार नाहीं.

**खलपुरुष**--(शद्ब रेटत) बळानं ह्या काळ्याकुट्ट रात्रीं मी तुझं सतीत्व नष्ट केल्यावर--

**नायिका**—सांगितलं ना तुला कीं सतीत्व तसं नष्ट होत नाहीं, आणि तें केवळ काल्पनिक आहे म्हणून ?

**खलपुरुष**—( धडपडत)-सतीत्व नष्ट केल्यावर मग कोण तुझा स्वीकार करतो तेंच मी पाहतों. हा : हा : !

**नायिका**—मूर्ख मूर्ख आहेस अगदीं ! त्यामुळें माझा स्वीकार करण्यासाठीं लोकांची चढाओढ लागेल नुसती ! उद्धार करण्यासाठीं सतीपेक्षां पतितेचाच खरा उपयोग होत असल्यामुळें, त्यांनाच आज जास्त भाव आहे.

**खलपुरुष**—(घामाझोकळ होऊन) भाव ? भावाच्या गोष्टी तूं बोलतेस ? हा : हा : ! आ— !

**नायिका**—उगीच शद्बबंबाळपणा मला आवडत नाहीं. चट्कन् मुद्द्याला ये. Come down to brass tacks !

**खलपुरुष**—( अवसान धरत ) हा : हा : ! प्रथम ही फुलांची माळ तुझ्याकरवीं माझ्या गळयांत घालून घेतल्यावर--

**नायिका**—हं : ! सभासंमेलनांत पुष्कळांच्या गळयांत मी आज पर्यंत हार घातले आहेत, आणखी पुष्कळांच्या गळयांत हातहि पण घातले आहेत ! चल आण तो हार इकडे.

**खलपुरुष**—( गोंधळून ) काय ? तो हार तूं माझ्या गळयांत घालणार ? —

**नायिका**—हो, हो ! घालणार ! And then do your worst ! आणखी मग टाकच तूं माझ्या अंगावर हात ! In the meanwhile, बँकेंत पैसे किती आहेत रे तुझे ?

**खलपुरुष**—( कोलमडत ) पैसे ?

**नायिका**--हो-हो पैसे ! म्हटलं नुकसानभरपाई द्यायची तरी आहे का अंगांत शक्ती ? का निघालायस् उगाच मर्यादाभंग करायला ?

**खलपुरुष**—( कांपत ) हा : हा : ! काय बोलतेस काय सुंदरी ?

**नायिका**—चल आटप ! अंगावर हात टाकणार ना तूं माझ्या ? कांहीं बिघडणार नाहीं माझं फारसं ! माझीं चित्रं येतील छाप्यांत ! नांव येईल ! सिनेमांत बोलावतील लोक मला ! एखादा उद्धार करणारा लग्न करील माझ्याशीं. Gee ! It is an idea ! चल, करच तूं माझ्यावर बलात्कार ! ( हात धरते. )

खलपुरुष—( इंबरडा फोडून ) धावा, धांवा! जुलूम-जबरदस्ती --बलात्कार ; वांचवा-धांवा-हा : हा : सोड, मुंदरी-सोड, मला ! शरण आहे. जाऊं दे मला—ऑ—

[ पळतो व नायिका त्याचा पाठलाग करत जाते. ]

सागण्याचा अर्थ इतकाच कीं नववाङ्मयांत जुन्या ठशाच्या खलनायकास आतां अगदीं वाव उरलेला नाहीं. तो ज्यास खलकृत्य मानीत असे त्यातील खलतेची नांगीच नव्या नैतिक मूल्यांनीं नष्ट करून टाकली आहे. धर्म, समाज, रूढी, बंधनें, संस्कृती, ह्यावर खलपुरुषा-ऐवजीं आजच्या नायक-नायिकाच हल्ले करीत असतात.

खलपात्राचें काम आतां ठरींव व एकमुखी राहिलेलें नाहीं. धर्म, नीति, संस्कृती, ह्यांस विरोधी कृत्यें करण्याचें खलपुरुषाचें कठीण महत्कार्य ह्या नव्या युगांत नायक-नायिकांनींच जातीनें स्वशिरावर घेतल्यामुळें खलपुरुषांची जुनी जात प्रथम बेकार व पुढें नष्टप्राय झाली. बाप नवरा, पत्नी, रुढी, धर्म ह्यापैकीं कोणाच्या मस्तकावर खलत्वाचा मुकुट केव्हां चढेल ह्याविषयीं आतां कोणतीहि निश्चिती न उरल्यानें कोणीहि खलपुरुष असेल वा आळीपाळीनें सारेच खलत्व पावतील. समान संधीच्या दृष्टीनें विचार करतां ही प्रगति क्वचित अभिनंदनीय आहे. खलतेची मिरासदारी आतां नष्ट झाली.

नांवें:—ललितवाङ्मयांतील पात्रांच्या नांवांचा इतिहासहि बोलका आहे, आद्य कादंबरीकारांच्या काळांत " रघुनाथ ", " शंकर ", "यमू" " मथू ", '' दुर्गी ", ह्यांसारख्या नांवांचीच रेलचेल होती. पद्मा, मालती म्हणजे अगदी सीमा झाली ! पुढें लीला, सुशीला, कमला, ह्या नांवांची चलती सुरू झाली. नायकात प्रभाकर, सुधाकर, वसंत, मधुकर, कमलाकर, हीं नावें फारच फ्याशनेबल मानलीं जात. श्यामा ह्या नांवांनें

कांहीं दिवस भाव मारलेला होता. पुढें अविनाश, अरविंद, ह्यांचें भाग्य फळफळलें. नायक–नायिकांच्या नांवात सनातनी, पुंजीपती, सुखासीन, मध्यमवर्गीय, नवकल्पनावादी, अशा आकांक्षांच्या पडछाया क्रमानें उमटत अखेर गाडी "क्रांति" "उन्माद" "उल्का" ह्या धडाकेबंद टप्प्यावर येऊन ठेपली. "विष्णू", "कृष्णा", "रामा", "गणपती", "दत्तात्रय" ह्यांसारख्या नांवांचे नायक व "उमा", "अंबा", "रमा", जानकी" ह्यासारख्या नांवांच्या नायिका नववाङ्मयांत अगदीं अकल्पनीय आहेत. मिळालाच तर त्यांना नोकरचाकरांचा, पुंजीपतीचा या सनातनी भटभटणींचाच "पार्ट" मिळूं शकेल. धर्माच्या अफूनें झिंगलेल्या कोणत्याहि नावास अद्यावत् वाङ्मयांत प्रवेश वा नांव घेण्यासारखें शहाजोग स्थान नाहीं.

जीवनावर परिणामः—स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, प्रेमविवाह, विधवाविवाह, ह्या साऱ्याचा पायंडा प्रथम कादंबऱ्यात पडला व मग समाजाची भीड चेपल्यावर ती प्रत्यक्षात आली. कोणतीहि गोष्ट कादंबरींत करणें हें नेहमींच सुलभ होतें. जीवन व वाङ्मय ह्यांचा कांहीं काळ बऱ्याच प्रमाणांत संबंध होता, व आतां तर हा संबंध इतका कांहीं प्रगत झाला आहे कीं जीवन कोणतें, व कादंबरी कोणती, हें ओळखणेंच दुरापास्त झालें आहे. पूर्वी "नाथ", "स्वामी", इत्यादि भांडवली विशेषणें कादंबऱ्यातील नायिका, नायकास उद्देशून वापरत असत. ( परंतु प्रत्यक्षांत मात्र तो प्रकार दिसत नसे. ) आता "वश्या" "मध्या" "अव्या" इत्यादि सलगीचीं समपातळीवरील संबोधनेंच मनोवृत्तींत पडलेलें एकेरी अंतर दाखवीत आहेत. नवरा–बायकोंतील विशेषणात्मक धनीवृत्ति प्रथम कादंबऱ्यांतूनच नष्ट केली गेली. वेश्याना आश्रय देण्याची संवय सनातनी असली, तरी वेश्यांशीं विवाह करण्याचा

पायंडा प्रथम कादंबऱ्यांनींच पाडला. विधवेला कुंकवाचे मळवट भरण्याचा क्रांतिकारक समारंभहि प्रथम साहित्यांत पार पडल्यावर मगच जागोजाग जविनांत त्याचे ठसे उमटले. ललितवाङ्मयांतील नायक-नायिकांच्या वेणीच्या शेपट्यानें प्रथम झोडपले गेल्यावर, मगच प्रत्यक्षात पुरुषवर्गाच्या पाठी रंगून निघाल्या. पुरुषावर सदैव चपला उगारून उभी असणारी वास्तवातील कडकलक्ष्मी ही केवळ तिच्या साहित्यिक प्रतिकृतीची पडछाया होय. विवाह हा संस्कार नसून व्यापार ( करार ? ) आहे ही उदात्त आरोळी साहित्यात सतत उठल्यावरच जीवनांत फुटलेल्या वैवाहिक घटाचे मधुर स्वर घुमावयास प्रारंभ झाला. गडकऱ्याच्या निष्ठावंत सिंधूविरुद्ध झालेली हुल्लड ही ह्या विवाहाच्या व्यापारात्मक विचारसरणींतूनच उत्पन्न झाली. एरवीं आत्मबलिदानाच्या एकमेव मार्गानें सुधारकाचें हृदयपरिवर्तन घडवून आणण्याचा तो अहिंसक प्रयत्न आम्हास अपरिचित वाटावयाचें कारण नव्हतें. वृंदावनाच्या हृदयांतील ईश्वर जागा करण्याची ईर्षा धरणाऱ्या वसुंधरेपेक्षा प्रत्यक्ष पतीच्या हृदयातील मानव जागा करण्याची आशा धरणारी सिंधू खरोखरच अधिक दोषपात्र होती काय, असा प्रश्न अनेक प्रतिक्रांतिकारक विचारीत असतात, त्यास आमच्या पालटलेल्या जीवनानें परस्परच तोडतोड उत्तर दिलें आहे.

आमचें वाङ्मय क्रांतिपथावर आहे व आमचें जीवन त्याच पथावर चार पावलें पुढें चालत आहे. ऐतिहासिक कादंबरी ही वस्तू आमच्या नववाङ्मयांतून जवळजवळ सीमापार झाली आहे, ही वस्तुस्थितीदेखील मोठी अर्थपूर्ण वाटते. शिवाजीची क्रांति ही मूलभूतपणें मार्क्सवादावर आधारलेली होती असें आम्हांस सिद्ध करतां आलें, तरच त्या मराठमोळ्यास जीवदान देण्याचा आम्ही विचार करूं. अगदीं स्वर्गस्थ पितरांस-

सुद्धां गचांडी देण्यास सिद्ध होईल इतकें आमचें जीवन व आमची जीवन-दृष्टि आमच्या वाङ्मयानें पालटून टाकली आहे. जुनें संतवाङ्मय हें भांडवली सरंजामी व मध्ययुगीन मनोवृत्तीचें असून त्यास अफूचा वास येत आहे, ह्या आमच्या प्रचाराचा योग्य परिणाम झाला असून नवे लेखक जुन्या वाङ्मयाचा, वाङ्मय म्हणून अभ्यास करावयासहि सहसा सिद्ध होत नाहींत.

**सावधतेची सूचना :** नववाङ्मयाची येथील प्रगति अद्यावत् व अगदीं समाधानकारक असली, तरीसुद्धां पश्चिमेस प्रतिक्रांतीचें कांहीं काळे ढग मधूनच दिसतात. नोबेल पारितोषिक मिळालेल्या एका इसमानें "Man the unknown" [अज्ञात मानव] नांवाचें भिकार चोपडें लिहून धर्माचा अप्रच्छन्न प्रचार केला आहे. दुर्दैवाने हा इसम विज्ञान-शास्त्री म्हणविला जातो. घटस्फोट, अतिप्रौढ-विवाह, स्त्रीपुरुषीकरण ह्या सारख्या आम्हीं हस्तगत व लोकप्रिय करींत आणलेल्या विद्यातहि तिकडे मधूनच कोणी माथेफिरू सुरुंग लावतो. अर्थात् दूर–पश्चिमेस सुरू झालेल्या ह्या उपद्व्यापाचें सुदैवानें इकडे कोणास फारसें ज्ञान नाहीं; परंतु क्रांतीचे रक्त–किरण ज्या प्रकारें इकडे आले, त्याच प्रकारें प्रतिक्रांतीचें धुकेंहि पसरत जाण्याचा कांहींसा संभव आहे. 'Human Destiny" नामक रटाळ पुस्तकाच्या विज्ञानशास्त्री लेखकानें तर परमेश्वराचें अस्तित्त्व गृहित न धरल्यास सारेंच विज्ञान कोलमडून पडेल असा दावा मांडला आहे. नववाङ्मयाच्या साऱ्या भक्तानीं ह्या विषयात जागरूक राहणें बरें.

**भरतवाक्य :** जुन्या जगाचा उखडूं पाया !
लाल नवतीच्या पडूं या पाया !
नवसाहित्यिक सारे या–या !!

—"हंस", जून ४९

# नैतिक मूल्यं

प्रत्येक युद्धानंतर नैतिक मूल्यें पार पालटून जाऊन त्यांची अगदीं अस्मानी सुलतानी होत असल्याविषयींची वार्ता बहुतेकांच्या कानावर असेलच. म्हणजे असें कीं एखादें युद्ध जुंपण्यापूर्वी जर साल्व्हरसान इंजेक्शनचा विषय होणारा मनुष्य इरसाल पाजी समजला जात असेल तर युद्धोत्तर काळांत तोच मनुष्य कादंबरीचा व एखाद्या कनवाळू पोरीचा प्रेमविषय होऊं शकेल. किंवा युद्धपूर्व काळांत एखाद्या माणसानें चुकूनहि दारू पिणें हराम समजलें जात असेल तर युद्धोत्तर काळांत मद्यपानाचें वेळापत्रक त्यानें चुकविणें हें हराम समजलें जाईल. ह्याचाच अर्थ असा कीं लढाईपूर्वीं जीं नैतिक वजनेंमापें वापरण्यांत येतात तीं लढाईनंतर रद्द ठरतात. नैतिक मूल्यें बदलून गेल्यामुळें लढाईपूर्वी जो गुन्हा समजण्यांत येतो तो लढाईनंतर पवित्र गुन्ह्यांच्या सदरांत जाऊन बसतो. लढाईपूर्वीं जे संभावित असतात, ते लढाईनंतर प्रतिगामी बदमाष ठरतात, व जे बदमाष असतात ते कित्येकदा पुरोगामी व मानवतेचे महान् मित्र समजले जातात. उदाहरणार्थ धारातीर्थी पतन पावलेल्या पतिदेवाच्या नांवानें एखाद्या योगिनीसारखें आयुष्य घालविणारी विधवा ही नैतिक मूल्यांच्या उलथापालथीनंतर फारशी आदरणीय मानली जाणार नाहीं. मुर्दाड भूत-काळाचा एक इतिहासजमा अवशेष येवढेंच महत्व तिला राहिलें तर राहील. उलटपक्षीं पेपरमिंटाच्या गोळीप्रमाणें बंदुकीची गोळी खाऊन आफ्रिकन आघाडीवर अखंडपणें घोरत पडलेल्या एखाद्या निद्राप्रिय वीराच्या सतीनें

युद्धमान राष्ट्रांच्या दरम्यान स्वाक्षरी होण्यापूर्वीच पुनर्लग्नाच्या वैध कागदावर स्वतःची स्वाक्षरी ठोकल्यास वीरस्त्री अधिक धीरोदात्त व पुरोगामी मानली जाईल.

खरेंच सांगायचें, तर युध्दें व महायुद्धें ही मानवी पुरोगमनाची दरएक पिढीनंतर येणारी अमूल्य पर्वणी होय. वाङ्मयांत विलक्षण लोकप्रिय होत चाललेल्या अनेक कल्पनांना महायुद्धांचाच भरीव आधार आहे. दम्यानें व्याकुळ होऊन ठसकत ठसकत विधवा-पुनर्विवाहाचा पुरस्कार करणाऱ्या आगरकरांचें जन्मकार्य युद्धकालीन मृत्युसंख्येनें पूर्णत्वास नेलें आहे. विधवांसाठीं पुनर्विवाह, येवढेंच नव्हे तर पुनर्विवाहासाठीं खंडोगणती विधवा निर्माण होत असल्याचें पाहून कोणाचें हृदय उंचबळून येणार नाहीं ? व कोणता सुधारक लेखणीचें कार्य तरवारीनें चोख बजाविल्याविषयीं शत्रूला मनःपूर्वक क्षमा देऊन युध्दाच्या ढोल-वाजंत्र्यांचा उपयोग पुनर्लग्नाच्या बेंडबाजासाठीं करून घेणार नाहीं ?

पुनर्विवाहाइतकेंच केशवपनाविषयीं जुन्या पिढीचे सुधारक चिंतातुर होते. स्त्रियांची मान कारागिराच्या तावडींत देण्यापेक्षां ती तलवारीनें छाटून टाकणें बरें, असें त्यांचें प्रामाणिक मत होतें. पण ह्या विषयात मात्र नव्या पिढीच्या मुलींनीं जुन्या पिढीच्या पगडीवर सुधारकांची चांगलीच उलटी केली आहे. कारण ह्या युद्धकाळात इतर चिंतांचा भार असह्य झाल्यामुळें आधुनिक अबला राजीखुषीनें नापितवर्गासमोर नतमस्तक होतात व आपल्या केशसंभाराची कधीं संपूर्ण तर कधीं समभाग कत्तल उडवून टाकतात ! हा काळाचा सूड होय !

विधवांचे नवरे व प्रश्न जसे युद्धामुळें निकालांत निघतात तसेच कुमारिकांचे प्रश्न युद्धामुळें जन्मास येतात. कुमारी मातांचा प्रश्न ही तर पुरोगामी गटाला युद्धकाळानें दिलेली विशेष देणगी होय. अर्थात् या



युद्धकाळांत नीतीचेंही रेशनिंग झालें.

प्रश्नांशीं शत्रूचा जेवढा संबंध पोहोंचतो त्यापेक्षां मित्रांचा तो कमी पोहो-चत नाहीं आणि खरेंच सांगायचें तर त्यांच्याच ह्या प्रश्नाशीं अधिक संबंध पोहोंचतो.

युद्धाचा मुहूर्त साधून कुमारिकांचा वर्ग स्वतःसाठीं व इतरांसाठीं किती प्रश्न व भानगडी उत्पन्न करूं शकतो तें पाहण्यासारखें आहे.. युद्ध-काळांतील पुरोगामी कुमारी निम्नलिखित एक किंवा अनेक पळवाटांचे पर्याय धुंडत धांवायला मोकळी आहे.

( १ ) वाग्दत्त पति ईरिट्रियांत गेला. तिथल्या बायकांचीं वर्णन लिहीत असतो. मलाहि भावना आहेत. तो जर तसा राहूं शकत नसेल तर मी तरी कां रहावें ? तो परत आल्यावर पाहूं मग !

( २ ) सारे तरुण आघाडीवर गेले. आतां एखादा श्रीमंत म्हातारा गांठल्याशिवाय गत्यंतर नाहीं. वारसा हक्क, घटस्फोट, विषम लग्न, लैंगिक

स्वातंत्र्य आदि अनेक प्रश्न नंतर आपोआपच उत्पन्न होतील व स्त्रियांच्या उन्नतीस तेवढाच हातभार लागेल !

( ३ ) आम्ही आर्थिक स्वातंत्र्य मिळविणार ! शिधाखात्यांत जागा मोकळ्या आहेत ! जमलं तर लग्न, नाहींतर कुमारी मातेचा प्रश्न.

( ४ ) लढाई संपली कीं पुष्कळशीं पोरं खिशांत नोटांचीं पुडकीं बांधून परत येतील ! तोंपर्यंत आपण संततिनियमनाचा पुरोगामी प्रयोग करणार ! लढाईमुळें उपकरण अगदीं बेभरंशाचीं झालीं आहेत ! साधली तर संतातिनियमाची सुधारणा, नाहीतर कुमारी मातेचा प्रश्न आहेच !

संतातिनियम, लैंगिक स्वातंत्र्य, आर्थिक स्वाधीनता, सहवासोत्तर विवाह किंवा नुसताच सहवास, कुमारी मातचा प्रश्न, इत्यादि अव्वल पुरोगामी कृत्यांचा युद्धकाळ हा मोसम होय ! पण येवढयाने सारें संपलें नाहीं.

युद्धाचे पहिले कांहीं अग्निगोलक उडतांच त्यांनीं सत्य व असत्य ह्याच्या बुरसटलेल्या पुरातन कल्पनाहि पार उडवून लावल्या ! बाजरीच्या विलक्षण पुष्टिदायक गुणधर्मांचा शोध युद्धकाळांत लागला. "जहूं" ह्या वस्तूमधील जीवनसत्त्वाविषयीं अकस्मात बोध झाल्यामुळें माणसांनीं त्याचा फडशा पाडावयास प्रारंभ केला व घोड्यांच्या पोटांत मत्सरानें कळा उठल्या. युद्धमान राष्ट्रें अट्टाहासानें दररोज रात्रीं सत्य केवळ आपल्याच बाजूस असल्याचें ओरडून सांगून सद्‌गुणांचें नामसंकीर्तन नियमित करूं लागलीं. हाणामार करणाऱ्या राष्ट्रांपैकीं कोणासच साम्राज्यें, संपत्ति, अधिकार, असल्या त्याज्य वस्तूविषयीं प्रेम नसून सारी धडपड केवळ सत्याच्या अंतिम विजयाविषयीं असल्याचें ऐकून स्वर्गांत देव संतुष्ट झाले. सत्याविषयीं जिज्ञासा ठेवणाऱ्या माणसाचें समाधान मोठ्या वळसेदार व अलंकारिकरीतीनें करण्याची नवी पद्धत अंमलांत आली व लोकप्रिय झाली. उदाहरणार्थ :

प्रश्न:—शत्रूनें केलेल्या हवाई हल्ल्यांत आपल्या पार्लमेंताचा दिबेतिंग हॉल नेस्तनाबूद झाला हें खरें आहे काय ?

उत्तर:—आजकाल सिमेंट दुर्मिळ व महाग झालें आहे. संपूर्ण बांधून काढल्याखेरीज डिबेटिंग हॉल आपणांस वापरतां येईल असें वाटत नाहीं. किंवा

प्रश्न:—नुकत्याच झालेल्या चकमकींत कॅप्टन "झ" हे कामास आले काय ?

उत्तर : पुनर्जन्माची भारतीय कल्पना खरी असेल, तरच कॅप्टन "झ" ह्यांच्या भेटीचा योग संभवतो !

प्रश्न : "ढ" हें शहर आपण खालीं केलें काय ?

उत्तर : आम्हीं मोकळी जागा खालीं केली ! आम्हीं परतलों, तेव्हा तें शहर अस्तित्वांत नव्हतें !

सदरहू भाषाप्रकाराचा अर्थ लावावयास मेंदूची जी शक्ती व्यर्थ खर्ची पडते, तेवढ्यांत युद्धप्रयत्नाचें गाडें कितीतरी पुढें जाऊं शकलें असतें. परंतु अस्फुट सौंदर्याच्या दृष्टीनें विचार करितां सदरहू भाषापद्धति अत्यंत स्पृहणीय आहे ह्यांत संशय नाहीं. शिवाय स्त्रियांचे विरोधी शब्द व विचित्र हावभाव ह्यांचें बिनचूक अर्थज्ञान देणारें शास्त्र जसें अस्तित्वात आलें, त्याचप्रमाणें सदरहू भाषाप्रकार उलगडण्याचा सांचाहि आतां जवळजवळ तयार झाला आहे.

बुद्धीस गुदगुल्या करणाऱ्या ह्या भाषेचें लोण समाजाच्या सर्व थरांपर्यंत उत्तम प्रकारें जाऊन पोहोचलें आहे. नैतिक व इतर मूल्यांत युद्धामुळें विलक्षण घालमेल झाल्याविषयींची दखलगिरी आतां प्रत्येकास आहे. गाईम्हशींचीं खिल्लारें बाळगणाऱ्या एका श्रमजीवि माणसांत व माझ्यात नुकताच पुढीलप्रमाणें संवाद झाला:—

मी : तुझ्या लोण्यांत भिसळ आहे. त्याला चरबीचा वास येतो !

तो : चरबी आणि लोणी ह्याचीं मूलतत्वें एकच आहेत असें माझा मुलगा म्हणत होता.

मी : पण मला लोणी पाहिजे होतें. चरबी पाहिजे असती तर मी गवळ्याकडे न जातां खाटकाकडे गेलों असतों !

तो : मी लोण्यात चरबी मिसळली ही गोष्ट खोटी आहे. चरबी-वरच मी लोण्याचा थोडा शिडकाव केला आहे !

मी : पण—

तो : ह्या लढाईच्या दिवसात चरबीलाच लोणी म्हणतात. त्याला आम्ही काय करावें ?

युद्धाच्या काळात सत्य आणि असत्य ह्यांच्या अर्थाची जराशी गल्लत झाली असल्याचें इतरहि अनेक प्रसंगीं माझ्या लक्षात आलें आहे. म्हणून मला चुन्याची निवळी पाहिजे असेल तेव्हा मी दुधाची मागणी करतों. मला लाकडाचा भुसा पाहिजे असेल तेव्हा मी तंबाखू मागवितों. मला पिठी पाहिजे असेल तेव्हा मी साखरेसाठीं ओरडा आरंभतों. आणि इमारत बांधण्यासाठीं मला दगड पाहिजे असतील तेव्हां मी कोळशासाठीं आकात मांडतों. अशा वांकड्या वळणानें गेलें म्हणजे बहुधा माझा कार्यभाग साधल्याचें माझ्या ध्यानांत येतें.

कोणत्याही गोष्टीचा कार्यकारणभाव लावणें ही गोष्ट एके काळीं कठीण समजली जात असे. पण आज तशांतला प्रकार राहिलेला नाहीं. कसल्याही अघटित प्रकाराचें समर्थन अथवा खुलासा आता युद्धाच्या सहाय्यानें अगदीं सहज करतां येतो. परवांच एका व्यभिचाराच्या खटल्यातील आरोपी स्त्रीचें समर्थन करतांना तिच्या पापाचा सारा दोष युद्धामुळें उत्पन्न झालेल्या Abnormal psychology वर एका वकीलानें

खुशाल ढकलून दिला! येवढेंच काय, पण त्या बाईनें वापरांत आणलेली नवीं नैतिक नाणीं लवकरच सर्व बाजार व्यापून बसतील, आणि वर्तमानाला नाहीं तरी निदान इतिहासाला तरी तिची कामगिरी मान्य करावीच लागेल असाहि हवाला त्यानें छातीवर हात ठेऊन भरला.

ट्रॅमगाड्यांचा वेग कमी कां झाला?—युद्धामुळें! गाड्यांतील गर्दी का वाढली? युद्धामुळें! स्त्रियाचे प्रश्न का बळावले?--युद्धामुळें! सांथींचे आजार कां सुरू झाले? युद्धामुळें! पाऊस का पडतो किंवा कां पडत नाहीं?—युद्धामुळें! वाण्यांची व शहाण्यांची नैतिक व इतर मूल्यें कां बदललीं?—युद्धामुळें! थोडक्यांत सागायचें म्हणजे आज जें जें कांहीं होतें, किंवा होत नाहीं, त्याला कारण केवळ एकच—हें युद्ध! नटापासून परिटापर्यंत किंवा कवी पासून कुलीपर्यंत सर्वांच्या तोंडांत "युद्धामुळें"

हा शब्द आज अगदीं साहजिकपणें ठाण देऊन बसला आहे. ह्या शब्दाची गोळी लागतांच प्रश्न विचारणारा माणूस ठार झालाच पाहिजे! पण ह्या युद्धजन्य प्रश्नोत्तराचाहि कधींकधीं अगदीं हास्यास्पद अतिरेक होतो. परवाच एका मालकीणबाईचा तिच्या नोकराशीं झालेला पुढील संवाद माझ्या कानावर आला:——

**बाई** : का रे, पळसाचीं पानं आणायला तुला सांगितलं होतं ना?

**नोकर** : काय सांगावं बाई, ह्या लढाईमुळें आजकाल पळसाला पानेंच येत नाहींत!

**बाई** : शेण तरी आणलंस कीं नाहींस मेल्या!

**नोकर** : ह्या लढाईपासून गाई म्हशींना काय झालं कुणास ठाऊक बाई, पण त्या.........!

——नवा झंकार ४ जून ४४

# नीतितत्त्वमीमांसा

[नीतितत्त्व मीमांसेच्या ह्या प्रथम समुल्लासांत मुख्यतः सत्यासत्याचें साकल्यानें, पण संक्षेपानें, आणि तरीहि सोदाहरण व सोपपत्तिक विवरण केलें आहे.]

"खरें बोला." "खोटें बोलूं नका."

"बोले तैसा चाले–" "Try, try again!"

"आईबाप व गुरुजी ह्यांचा मान राखा."

"उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी."

—इत्यादि भरीव नीतितत्त्वें आपल्या गळीं उतरविण्याचा कसो-शीचा प्रयत्न बालपणापासून (आपल्या व सुधारणेच्या बालपणापासून!) आईबाप व गुरुजन करीत आले आहेत. लहान मुलाच्या अननुभवी व अपरिपक्क बुद्धीविषयीं फाजील भरंवसा बाळगल्यामुळेंच व्यवहारी आयु-ष्यात अतिशय बेभरंवशाचे ठरणारे हे नैतिक कित्ते घटवणुकीसाठीं वडील-धाऱ्यांनीं तरुण पिढीसमोर शतकानुशतकें धरले होते. पण लहान मुलाची बुद्धि कितीहि अपरिपक्क असली तरी ती असल्या नीतितत्त्वांना सहजा-सहजीं बळी जाण्याइतकी कधींच वायां गेलेली नव्हती, ह्याला एकामागून एक येणाऱ्या तरुण पिढ्यांनीं घडविलेला जगाचा इतिहासच साक्ष देईल!

हरिश्चंद्र, शिबी, तुकाराम, एकनाथ इत्यादि महात्मे जन्मले व मेले. त्यांच्या नांवानें क्रमिक पुस्तकांत धडेसुद्धां झाले. त्यांपैकीं कांहींच्या

चित्रशाळेंत छापलेल्या रंगीबेरंगी बोधवचनांनीं शाळांच्या फटफटीत भिंतींना वैचित्र्य आणलें. लोक म्हणतात कीं हे महाभाग आपआपलें अवतारकार्य संपवून मेले. (ह्या विषयांत त्या महात्म्यांचें मत काय असेल कुणास ठाऊक!) शंकराचार्य, बुद्ध, महावीर ह्यांनींहि आपआपल्या परीनें कमी खटाटोप केला नाहीं. परंतु त्यामुळें जगाचें कुठेंहि फारसें बिघडलें नाहीं. चार मोठ्या माणसांचें करावयास पाहिजे तेवढें त्यांचेंहि कौतुक जगानें केलें. येशू ख्रिस्तानें तर अगदीं मानवजातीच्या उद्धारासाठीं व आकाशातल्या राज्यासाठीं स्वतःस एका अट्टल चोरासमवेत खांबीं खिळून घेतलें. तो देखावा पाहून जग मनातल्या मनांत हंसलें, मग रिवाजाप्रमाणें जयघोष करीत "साधु! साधु!" म्हणून ओरडलें; येशूच्या नीतितत्वाचा 'उदो' सुरू झाला, जगाच्या मोठ्या लोकसंख्येनें येशूच्या शिष्यत्वाचा गंडा बांधला, व अनंतकाळ येशूची स्मृति जागृत ठेवण्याचा निश्चय करून टाकला. पण जगानें येशूचें उदाहरण जितकें लक्षांत ठेवलें त्यापेक्षा अनंत-पटींनीं अधिक त्यांनीं येशूशेजारीं खिळल्या गेलेल्या त्या अट्टल चोराचें स्मरण ठेवलें! 'आकशातल्या राज्या' सारख्या मानीव कल्पनेसाठीं फुकट मरणारा येशू व खात्रीपूर्वक हातास लागणाऱ्या एखाद्या घवघवीत वस्तूच्या लाभासाठीं जिवाचें रान करीत असता कर्मयोग्याचें मरण येणारा तो चोर, ह्यातील भेद न कळण्याइतकें जग कधींच मूर्ख नव्हतें! येशूचें अवतारकार्य पूर्ण झालें असा भ्रम उत्पन्न करण्यासाठीं जगातल्या चलाख मंडळींनीं येशूचे पुतळे पाडले, चित्रें लटकावलीं, त्याच्या नीतितत्वाचा गजर मांडला, आणि व्यवहाराच्या सोईसाठीं मात्र येशूइतकेंच वीरमरण मेलेल्या त्या कसबी चोराचीं पावलें नीट निरखून ठेवलीं! अखेर तत्व तें तत्व व व्यवहार तो व्यवहार!

* * *

'आपण एवढे काहीं वाईट लोक नाहीं—' अशी आत्मसंतोषाची भुरटी भावना कायम ठेवण्यासाठींच अनेक नीतितत्त्वें निदान पुस्तकापुरतीं तरी जिवंत ठेवण्यांत आलीं आहेत. 'आपण मनुष्यसमाजाची नैतिक पातळी वरीच वर उचलली' अशा 'ग' ची बाधा करणारा गैरसमज करून घेऊन अनेक 'श्री' अखेरचा सुस्कारा सोडतात, तेव्हा समाजाची नैतिक व इतर पातळी जेथें होती तेथेंच असते! फरक इतकाच पडतो की व्यवहारी चतुराच्या चातुर्यास पाघरण्याजोगे नवे मुखवटे अजाणता घडवून एक तऱ्हेवाईक मनुष्य निजधामास जातो, व एका डोळयानें हंसत आणि दुसऱ्या डोळयानें रडत नीतितत्त्वाचें योग्य बाजारू मोल ओळखणारें कृतज्ञ जग त्याचे पुतळे घडवावयास बसतें! हिरव्या-तांबडया शाईत लिथोप्रेसवाले बोधवचनें छापावयास घेतात! बोधवचनाच्या ह्या नव्या हल्ल्यामुळे गांगरलेलीं शाळकरी पोरें आचंब्यात पडून नखें चावतात!

नीतितत्त्वाचा निरुपयोगीपणा ओळखून असणारी वठलेली पिढी स्वतःच्या आत्मिक समाधानासाठीं त्या तत्त्वाचे तोंडीं प्रयोग शाळकरी पोरावर करीत सुटते. "खरें सत्य बोला, यथातथ्य चाला" म्हणून मुलाबाळाच्या कानाशीं सारखा काव्यात्मक कंठशोष करणाऱ्या गुरुजनापैकीं खरोखर खरे बोलण्यास अथवा "यथातथ्य" चालण्यास कितीजण राजी असतात? त्यांचा सत्याविषयींचा दर्शनी पुळका हेंच मुळीं असत्याची बिनचूक पटवून देणारें एक जबरदस्त ढोंग असतें. त्याचा सत्यावर विश्वास असता, आणि त्याना इमानेइतबारेंच बोलावयाचें असतें, तर राष्ट्राच्या कोवळ्या आधारस्तंभाना त्यानीं स्वच्छ सांगितलें असतें कीं, 'बाबानो! तुम्हाला खरेंच सांगावयाचें म्हणजे खरें बोलण्याच्या अथवा यथातथ्य चालण्याच्या फंदात तुम्ही चुकूनहि पडूं नका! आम्ही तुम्हाला खरें बोलण्याचा उपदेश करतों कारण तसा उपदेश करण्याची आजची पद्धत आहे!

त्याच्यासाठींच आम्हांला पगार मिळतो ! आम्हांला कुचकामाचीं वाटणारीं हीं नीतितत्त्वाचीं खेळणीं अगदींच फेकून देण्यापेक्षा तीं आम्ही तुम्हां लहान मुलांच्या हातांत देत आहोंत ! आमची ही थट्टा तुमच्या विषयात-सुद्धां अखेर निरुपद्रवीच ठरणार हें आम्हांला स्वानुभवावरून माहीत आहे ! तरी पण तुम्हाला सांगून ठेवतों कीं, खरेंपणाच्या भानगडींत कधींहि पडूं नका ! ह्या अल्प वयातहि तुमचा खरा कल शृंगारिक चित्रा-कडेंच आहे हें आम्हाला माहीत असूनहि घोडा, बैल वगैरेंच्या चित्रांबरोबरच हीं रंगीबेरंगी बोधवचनेंहि आम्हांस शाळेच्या भिंतींवर लावणें भाग पडतें ! पण खरेंच सांगायचें तर एक वेळ एखाद्या लाथाळ घोड्यावर किंवा मारक्या बैलावर विश्वास ठेवा, पण ह्या नीतितत्त्वाची महती गाणाऱ्या बोधवचनावर विश्वास ठेवूं नका ! "बरें सत्य" बोलून किंवा "यथा-तथ्य" चालून आजपर्यंत ह्या जगात कुणाचेंहि भलें झालेलें नाहीं ! ह्याउपर, तुम्हाला नुसती पुतळ्याची आणि पुण्यतिथ्याची मरणोत्तर कमाईच करायची असली तर गोष्ट वेगळी !"

* * *

नीतितत्त्वाच्या मायानगरींत तरळणाऱ्या अनेक विदेही रहिवाशापैकीं 'सत्य' हा एक प्रमुख रहिवासी होय. सत्याच्या नादीं लागल्यावरहि ज्याचें तळपट उडालें नाहीं असा लहान किंवा मोठा माणूस जगाच्या लांबलचक इतिहासातहि शोधून सांपडणें दुरापास्त ! स्वतःचे बारा वाज-वून घेण्याचे जे अनेक उपाय उपलब्ध आहेत, त्यापैकीं सत्याचरण हा अगदीं रामबाण होय ! खुद्द प्रभुरामचंद्राचेंच उदाहरण. ह्या विषयांत अतिशय बोधप्रद ठरेल. एका क्रव्यादा व मत्सरी बाईला बापानें दिलेला वर खरा करून दाखविण्याच्या कर्तव्यनिष्ठ भरात रामरायांनीं सिंहासनाऐवजीं दंडकारण्य पाहिलें ! ह्या अतिनैतिक आचरणाचा क्रमप्राप्त भूदंड म्हणून पुढें त्यांना सीतामाईला पारखे होऊन लंकेचें काळें पाणी पाहावें लागलें,

वानर आणि अस्वलें ह्यांची अजीजी करावी लागली, व अखेर अब्रूवर आणि जीवावर बेतलेला तो सर्व प्रसंग जेमतेम मारुतीरायाच्या शेपटीवर कसा तरी निभावला ! सीतादेवीच्या हरणामुळें व दंडकारण्यांतील एकंदर रामायणामुळें रामचंद्राच्या नांवावर जो शिंतोडा उडाला, त्यापेक्षां अधिक शिंतोडा त्यांनीं आपल्या म्हाताऱ्या बापाच्या सत्यपालनात साथीदारी करण्याचें साफ नाकारल्यामुळें खचित उडाला नसता ! बरें, एवढें सारें झाल्यावर रामाचा सत्यवादित्वावर अढळ विश्वास राहिला असें म्हणावें तर तेंहि अशक्य आहे ! उलटपक्षीं, सत्यपालनापायीं दंडकारण्यांत जीवाचें रान व बरेचसें चिंतन केल्यावर सत्याचरणाचा फोलपणा रामरायाना पटूं लागला होता असें विधान करावयास मात्र भरपूर अवसर सापडतो ! वालीवधाच्या प्रसंगीं प्रभु रामचंद्राकडून घडलेलें विलक्षण वर्तन व चंद्रसेनेच्या विषयांत त्यांनीं आचरणांत आणलेली अजब चलाखी, हीं त्यांच्या वैचारिक क्रांतीचीं निदर्शक नाहींत असें कोण म्हणेल ?

सत्त्वस्थपणाचा व सत्यवादित्वाचा मोठा भोक्ता म्हणून राजा हरिश्चंद्राचें नांव आपणांस वारंवार सांगण्यांत येतें. आम्हास तर हरिश्चंद्राच्या चारित्रात अव्वलपासून अखेरपर्यंत आत्मघातकी भोळसटपणाशिवाय दुसरें कांहींच सापडत नाहीं. राजाचा दास व महाराणीची मोलकरीण केवळ सत्त्वपालनाच्या मूर्ख वेडापायीं कशी होऊं शकते ह्याचें डोळे चोळावयास लावणारें चित्र कोणास पाहावयाचें असेल, तर त्यानें राजा हरिश्चंद्राच्या चरित्राचें अवलोकन करावें. अंगास राख फासडून जटा वळणाऱ्या निस्संग वैराग्याच्या व त्यांनीं निर्माण केलेल्या सत्त्वविषयक मायाजालाच्या आहारीं हरिश्चंद्र गेला नसता, तर अयोध्येचें राज्य कांहीं काळ तरी भोगण्याची विश्वामित्राची पाताळयंत्री हौस कधींहि पूर्ण झाली नसती, व मस्तकावर मूल्यवान् राजमुकुट धारण करण्याऐवजीं फुटक्या

मडक्यानें डोक्यावरून व डोळ्यांतून पाणी वाहण्याचा प्रसंग हरिश्चंद्रावर गुदरला नसता ! सत्याचा विलक्षण कैफ चढल्यामुळें रोहिदासाचा राज्यावरील अधिकार धोक्यांत आणावयास तर हरिश्चंद्र सिद्ध झालाच, पण त्याचें मुंडकें उडविण्यातहि त्याला विशेष कांहीं वाटेनासें झालें ! स्वतःस व आपल्या निरपराध जायापुत्रास एवढी पीडा देऊन हरिश्चंद्रानें अखेर मिळविलें काय तर ' सत्त्वधीर ' ही फुकाची पदवी ! हरिश्चंद्राला पदवीच पाहिजे होती तर त्याच्यासारख्या राजाला कांहीं भोजनप्रिय ब्राह्मणाच्या सहकार्यानें ही पदवी स्वतःच्या नावामागे सहज लावून घेतां आली असती. आजकालच्या रावबहादुराना पार्ट्या देऊन जें सहज करता येतें तें हरिश्चंद्रासारख्या राजाला अशक्य होतें काय ? असे झालें असतें तर स्वप्नांत दिलेला शब्द न पाळल्याविषयीं सत्त्वहरणाची पोकळ धमकी देणाऱ्या विश्वामित्राची वासलात त्याला पुढील शब्दात लावतां आली असती—

**विश्वामित्रः** राजा हरिश्चंद्रा ! काल स्वप्नात तूं मला दिलेलें वचन स्मरणांत आहे ना ?

**हरिश्चंद्रः** काय म्हणता मुने ! मीं आपणांस वचन दिलें होतें ?

**विश्वामित्रः** होय, राजन् !

**हरिश्चंद्रः** आणि तेंहि स्वप्नांत ?

**विश्वामित्रः** होय राजन् !

**हरिश्चंद्रः** क्षमस्व, मुनिश्रेष्ठ ! पण आपलें डोकें फिरलें असलें पाहिजे !

**विश्वामित्रः** ( दचकून ) ! !–? ?–! !...

**हरिश्चंद्रः** प्रजेच्या चिंतेमुळे ज्या मला रात्रभर झोपच येत नाही, त्या मला स्वप्न पडेल हें कसें संभवनीय आहे ?

**विश्वामित्रः** सत्त्वधीर राजा हरिश्चंद्र हीं उडवाउडवीचीं उत्तरें देत आहे काय ?



**हरिश्चंद्र:** होय, मुनिजनश्रेष्ठ ! तोच !

**विश्वामित्र:** स्वप्नांतील वचनाचा तुला खरोखरच विसर पडला काय ?

**हरिश्चंद्र:** मला झोप येत नाहीं, झोप आली तरी मला स्वप्नें पडत नाहींत, आणि स्वप्नें पडलीं तरी स्वप्नातहि मी राज्यकारभार कशाशीं खातात तें माहीत नसणाऱ्या बैराग्याला माझें राज्य दान करण्याचें वचन देणार नाहीं !

**विश्वामित्र:** आणि दिलें तरी पाळणार नाहीं ! बोल, शद्बाला जागून राज्य देतोस कीं तुझें सत्त्व घेऊन जाऊं !

**हरिश्चंद्र:** आपण राज्य मागण्यासाठीं आला आहांत कीं सत्त्व !

**विश्वामित्र:** ( त्राग्यानें ) राज्य देतोस कीं सत्त्व नेऊं ?

**हरिश्चंद्र:** ठीक आहे. तर मग आपण माझें सत्त्वच घेऊन जावें !

(सत्ताधीश राजाचें सत्त्व हिरावणें ही फारशी सोपी गोष्ट नसल्या-मुळें राज्य किंवा सत्त्व ह्यांपैकीं काहींच न घेतां दाढी पिंजारून चडफडत विश्वामित्र निघून जातो. नंतर–)

**अमात्यः** धन्य महाराज! धन्य–धन्य! हा बिकट प्रसंग महाराजांनीं फारच खुबीनें पार पाडला! राजाधिराज हरिश्चंद्रकी जय! **सत्त्वधीर** राजाधिराज हरिश्चंद्र महाराजकी जय!

(सभाजनहि एकमेकाच्या आवाजाशीं स्पर्धा करीत 'तसें' ओरडतात–न ओरडून सांगतात कुणाला?)

* * *

पौराणिक काळात सत्याच्या खडकाळ व नागीक मार्गानें निष्कारण ठेचाळत गेलेले बरेच पांथस्थ सांपडतात. म्हाताऱ्या व बावचळलेल्या बापाच्या माथेफिरू लहरीसाठी नाहीं त्या प्रतिज्ञा भोगणाऱ्या भावनावश तरुणाची त्या काळात नुसती साथ आलेली होती. रामानें आपल्या आयुष्याचें केलेलें रामायण सर्व शहाण्या लोकास ठाऊकच आहे. परंतु रामानें वनवास भोगला असला तरी काहीं काळ राज्यहि केलें, त्यानें अखेर बायको टाकून दिली असली तरी त्यानें निदान बायको केली होती. परंतु ह्या विषयात भीष्माची कडी श्रीरामाच्याहि वर आहे! त्या बहाद्दरानें कर्तव्यनिष्ठ सत्यप्रियतेच्या झटक्यात राज्यावरचा अधिकार तर कायमचा सोडलाच, पण वर आजन्म ब्रह्मचर्याची शपथ घेतली! आणि ह्यानंतर अखेर उतारवयात पितामहानीं पत्करलें काय तर दुर्योधनासारख्या धन्याची चाकरी व 'अर्थस्य पुरुषो दासः' हें धोरण! सत्यप्रतिज्ञ कर्तव्यनिष्ठपायीं रामचंद्राची जेवढी दुर्दशा उडाली त्यापेक्षा कितीतरी अधिक ती भीष्माची उडाली! रामानें युद्ध केलें व भीष्मांनींहि युद्ध केलें. पण राजा रामचंद्रानें केलेल्या युद्धात स्वार्थाचा व कीर्तीचा भाग होता,

आणि त्या युद्धांतून हरहुन्नराने श्रीराम यशस्वीरीत्या बाहेरहि पडले;पण भारतीय युद्धांत पितामह भीष्म मात्र केवळ नोकरीपेशापायीं हकनाक प्राणांस मुकले! भीष्मासारखा राजबिंडा राजपुत्रहि सत्वपालनाच्या भलत्या भरीस पडल्यामुळें भिकेस लागून अखेर त्याचा सत्यानाश कसा होतो, ह्याची शोचनीय कथा भीष्मचरित्राने गाफील व स्वप्नाळू तरुणांस कंठरवानें सांगितली आहे.

हरिश्चंद्र, भीष्म, राम ह्यांनीं केलेल्या सत्याच्या प्रयोगास जीं भयानक फळें आलीं तीं पाहून वास्तवतावादी लोकांस सत्ययुगाचा वीट आला, व ह्या ' वैचारिक क्रांतीपोटीं 'च यथावकाश कलियुगाचा जन्म झाला !

पौराणिक, ऐतिहासिक भूत-व निकटच्या वर्तमानकाळात सत्याचा व सत्यव्रतांचा सर्रास बोजवारा उडालेला पाहून सत्याशीं केवळ नांवापुरताच संबंध ठेवण्याचें सोईस्कर धोरण प्रगत मानवानें ठरविलें आहे. ' सत्यमेव जयते ' ह्या म्हणीवर किंवा जय मिळविण्याच्या सत्याच्या शक्तीवर मुळींच विश्वास नसताहि दोन युद्धमान् पक्ष सत्य आपल्याच पाठीवर हात देऊन उभें असल्याचें आक्रोशानें सांगतात. शाब्दिक सलगीनें सत्यावर साचलेला सूड उगवण्यासाठी "खरें बोलायचें तर–""सत्याला स्मरून सांगायचें म्हणजे–" "खऱ्याला काय मरण आहे ?", "खोट्याच्या कपाळीं गोटा !" इत्यादि वाक्प्रचारात्मक पोपटपंची चालू ठेवून बिचाऱ्या सत्याला आपण एका मुर्दाड म्हणीची अवस्था आणून दिली आहे ! आणि क्रियेशीं फारकत झालेलें अशक्त सत्य वाचाहि न फुटतां ह्या साऱ्या सोहळ्यांत समाधान मानीत आहे ! ज्या सत्यानें एके काळीं राम, भरत, भीष्म, हरिश्चंद्र ह्याच्या सारख्याची बुद्धि गुंग करून त्यांस लोळविलें, त्या सत्याला अगदीं लीलेनें आज आपण केवळ नाममात्र करून

सोडलें आहे ! सत्यासाठीं स्वतःस पणाला लावण्यापासून स्वतःसाठीं सत्याला पणाला लावण्यापर्यंत 'मानवा'नें केलेली प्रगति त्याच्या बुद्धिमत्तेची द्योतक असून ती अभिनंदनीय नाहीं असें कोण म्हणेल? बरें, एवढें असून सत्याचें अलंकारिक मानपान आपण हिरावून घेतले असेंहि नव्हे. सत्याचा जयघोष करण्याच्या विषयांत आपण कोणत्याहि युगांतल्या कोणत्याहि महाभागाला हार जाणार नाहीं. केवळ सत्याची दांत व नखें काढून त्याला निरुपद्रवी करण्याची व्यवस्था मात्र स्वसंरक्षणाच्या दृष्टीनें करणें आपणांस भाग झालें आहे ! लहानपणापासूनच सत्यासत्याच्या सापेक्ष विचारांत तरुण पिढीला तरबेज करून सोडण्याची आपली कुसराईदेखील पाहण्यासारखी आहे.

× × * × ×



समजा कीं शंभूरावांचा छोटा मुलगा सोन्या ह्यानें बाजारातील चिवडा विकत घेऊन खाण्यासाठीं वडिलाच्या खिशांतील चार आणे लांबविले, व खिशांतील पैसे लांबविण्याची ही स्फूर्ति त्यानें आपली माता पार्वतीबाई व नोकर गणपत ह्यांच्यापासून घेतली. चोरी व चहाडी, सत्य व असत्य ह्यांच्याविषयीं अद्याप सोन्याच्या कल्पना फारशा स्पष्ट नाहींत. उलटपक्षीं, "सत्य सदा बोलावें" ह्या उपदेशावर व लहानग्या जॉर्ज वॉशिंग्टनच्या त्या कुप्रसिद्ध गोष्टीवर अजूनहि सोन्याचा विश्वास आहे. "कारट्या, खरें बोल!" म्हणून घर

दणाणून सोडणारी आरोळी व सोन्याच्या कनपटांत शंभुरावांचीः थप्पड उमटतांच सोन्या भराभर बोलूं लागेलः—

**शंभुराव :** कारट्या, तूं घेतलेस कीं नाहींस पैसे? खरें बोल !

**सोन्या :** घेतले. (ऊं–ऊं!)

**शंभुराव :** किती घेतलेस? पाहा, खोटं बोलूं नकोस !

**सोन्या :** चार आणे घेतले! (ऊं–आँ–!)

**शंभुराव :** काय केलंस त्या पैशाचं ! खरं सांग, नाहींतर फोडून काढीन ! (आणखी एक थप्पड!)

**सोन्या :** चिवडा खाल्ला. (हॉ–हॉ–!)

**शंभुराव :** गधड्या, वर सांगतोस आणखी? (एकीकडे खरें बोलण्याविषयीं विलक्षण आग्रह करीत असतां दुसरीकडे हें असें!)

**सोन्या :** (जखमी हृदयानें डोळे विस्फारून नुसता पाहत राहतो.)

**शंभुराव :** (थप्पड उगारून) कुठं शिकलास हे गुण? खिसे चाचपायला शिकलाय दळभद्रा!

**सोन्या :** (सात्विक संतापानें) आईसुद्धा खिसे चाचपत होती ! गणपत पण–

सत्यभाषणाचा हा उच्चांक सोन्याच्या आईला परवडणे शक्य नाही. शंभुरावाची तांबारलेली नजर संशयीपणें स्वतःवर वळलेली पाहताच साध्वी पार्वतीबाई "मेल्या, बोल, आणखी खोटं बोल!" म्हणून सत्यप्रतिज्ञ व असहाय्य सोन्याच्या अंगावर चाल करून येतात. व खोटे धरून त्या त्याला आंत ओढत नेतात व मातृहृदयाला न शोभणाऱ्या आकसानें त्याची कणीक तिंबून काढतात. सोन्याच्या वैचारिक क्रांतीचा तो क्षण होय. अपराधाच्या मान्यतेचे व सत्यभाषणाचे खरे परिणाम आतां त्याच्या लक्षांत येतात. लहानग्या मुलांनीं दिलेलीं निस्पृह उत्तरें ऐकून वडील माणसें

गहिंवरून येत नाहींत, त्यांच्या डोळ्यांत पाणी जमत नाही, तीं त्यांना छातीशीं धरत नाहींत, किंवा सत्यभाषणानें प्रसन्न होऊन तीं "लाडक्या, तुला म्या क्षमा केली आहे" असेंहि म्हणत नाहीत, अशी खूणगांठ मनाशीं बांधून ह्यापुढें सोन्या आपला वर्तनक्रम आखतो.

पुढें सोन्या मोठा होतो, कॉलेजांत जाऊं लागतो, व चिवडा खाण्याऐवजीं पाढऱ्या बिडया पिण्यास प्रारंभ करतो. सोन्याचे थकूं लागलेले वडील त्याला एक दिवस पुसतातः–

**शंभुराव** : सोन्या, माझ्या खिशांतले पैसे काय होतात रे ?

**सोन्या** : कुणास ठाऊक बुवा ! आजकाल गावात खिसेकापूंचा फार सुळसुळाट झाला आहे !

**शंभुराव** : पण हें असें नेहमी–

**सोन्या** : (त्याना मधेंच अडवून) तुमच्या खिशालाच भोक असेल! तो जुना कोट बदला तरी आता !

**शंभुराव** : सोन्या, तुझ्या तोंडाला वास कशाचा येतो आहे रे ?

**सोन्या** : माझ्या तोंडाला ? छट् ! तुमच्याच बिडयाची घाण मला येत आहे ! ह्या वयात इतक्या बिडया ओढणें बरें नव्हे, बाबा ! त्यापेक्षां तुम्ही सिगरेट्स् तरी ओढत जा !

**शंभुराव** : किती खोटं बोलतोस रे, सोन्या !

**सोन्या** : तुम्हाला माहीतच आहे मला खोटयाची किती चीड आहे ती ! खोटं मी कधींच बोलत नसतों !

–सत्यासत्यविचारांत पारंगत झालेला सोन्या सुधारलेल्या जगाचा नागरीक होण्यास आता सर्वस्वी योग्य झाला आहे !

–अभिरुची, दिवाळी ४५

# सुख दुःख विवेक

सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वता एवढें—तुकाराम बुवा

जगीं सर्व सूखी असा कोण आहे ?—रामदास स्वामी

महाराष्ट्राच्या उपरोल्लेखित साधुपुरुषांत एरवीं फारसें साम्य नाहीं. घरोघर लटकावून दिलेल्या ह्या संतपुरुषाच्या चित्रावरून हीच गोष्ट डोळ्यांत ( व मनांत ) भरते. तुकारामबुवांचा रिवाज सामान्यतः खुरमांडी घालून भजन करीत बसण्याचा असावा. रामदासांची भिस्त मात्र महाराष्ट्राच्या भूमींत दोन पायावर सदैव उभे राहून खडा पाहारा देण्यावर होती. तुकारामबुवा ( आज उपलब्ध असणाऱ्या त्यांच्या चित्रांत ) नखशिखान्त पोषाख केलेले आढळतात. रामदासांचा भर त्यांच्या हातांतल्या दंड्यावर मुख्यतः होता, उलटपक्षीं तुकारामबुवांचा कटाक्ष त्यांच्या हातांतल्या तंबोरीवर व चिपळ्यांवर विशेष ! रामदासांनीं आक्राळविक्राळ अशा दाढीमिशा वाढविलेल्या, तर तुकारामांचें काम तुलनेनें पाहतां अगदीं साफ ! मंगलाष्टकांनीं ओरडून दिलेली भयंकर सूचना ऐकतांच रामदासांनीं बालवयातहि बोहोल्यावरुन पळ काढला, आणि तुकारामबुवा मात्र गाफील भोळसटपणें लग्नाच्या लबेद्यांत कायमचे अडकून पडले. तुकारामाचा छळ अनेक अलबत्या गलबत्यानीं अनेकदां केला, परंतु बिनापरवानगीनें खाल्लेला उंस गोड असला, तरी शेताच्या धन्यानें दिलेले त्याच उसाचे रपाटे गोड असत नाहींत, हें लक्ष्यांत येण्याचा प्रसंग राम-

दासावर एकदांच आला होता. तरीहि भिन्न प्रकृतीच्या व भिन्न आकृतीच्या ह्या महाराष्ट्राच्या दोन महापुरुषांनीं सुख आणि दुःख ह्यांच्या विषयींचा निर्णय मात्र एकच दिला आहे. भेद इतकाच कीं राजकारणी रामदासांनीं शब्दांत न गुंतण्याची सावधगिरी घेऊन "**जगीं सर्व सूखी असा कोण आहे ?**" हा अलंकारिक प्रश्न खड्या स्वरात आपणच आम जनतेला विचारून उत्तराचें उत्तरदायित्व परस्पर लोकावरच ढकललें, व भोळ्याभावाच्या तुकारामांनीं "**सुख पाहता जवापाडे, दुःख पर्वता येवढे**" असें सुखदुःखाविषयीं निश्चित विधान करून त्यांतील एकाचें दुसऱ्याशीं असणारें नक्की प्रमाणहि दशांशापर्यंत मोकळ्या मनानें जगाला सांगून टाकलें. वाणिज्य व्यवसायाचा हिशेब तुकारामाला जन्मभर जमला नाहीं, पण सुखदुःखाचें बेजार करणारें गणित मात्र त्याला अगदीं उत्तरासकट चुकवूनहि चुकविता आलें नाहीं !

"Great men think alike" ही फिरंगी भाषेंतील म्हण ध्यानात घेऊनहि तुकाराम व रामदास ह्यानीं सुखदुःखाविषयीं काढलेलें समान सार कुतूहलास कारणीभूत होतें. महामना मंबाजीकडून झालेली मृगया, अभंग वाणीस घडलेलें इंद्रायणीचें स्नान, शेतराखणीच्या कामीं पाखराना आपण उडविण्याऐवजीं पाखरानींच धान्य उडविण्याचा प्रसंग व त्याचे अलौकिक परिणाम, ह्या गोष्टी वजा केल्या तरी नुसत्या एका बेजा तोंडाच्या बाईशीं आजन्म बांधले जाण्याचा अनुभवच तुकाराम बुवाच्या तोंडून "**सुख पाहतां जवापाडे**" असे केविलवाणे उद्गार काढावयास समर्थ होता. दुःखाचें प्रमाण जेव्हा मणभर असतें तेव्हा सुखाचें प्रमाण छटाकभरहि पडत नाहीं, हा अखेर सदेह स्वर्गास जाणाऱ्या आमच्या शूद्र कवीस आलेला अनुभव स्वर्गापासून सदैव केवळ दोन बोटांवर लटकत राहिलेल्या कोणत्या विवाहित पुरुषास नवलपरीचा वाटणार नाही ? प्रत्यक्ष

पांडुरंगाशीं घसट ठेवणाऱ्या तुकारामाची सुखाच्या विषयांत जी अवस्था होती, त्यापेक्षां " बळे आगळा असणाऱ्या कोदंडधारी " रामापर्यंत पोंच ठेवणाऱ्या रामदासांची कांहीं वेगळी नव्हती. लग्न करून तुकाराम दुःखी होते, तर लग्न न करून ( न केल्यामुळें ? ) रामदास दुःखी होते. पागोटे, अंगरखा व मांडी घालून तंबोरी वाजवीत बसलेले तुकाराम स्वतःच्या परमार्थी संसारापायीं जितके जेरीस आलेले होते, तितकेच वस्त्राप्रावर्णाची फारशी पर्वा न करिता मनास श्लोक सागत पायपीट करीत फिरणारे रामदास राष्ट्राच्या संसारापायीं जेर झालेले होते. सदेह स्वर्गास नेण्यासाटीं विमानाचें आगमन होणें अथवा उघडया डोळां राम पाहण्याचा वखत येणें, अशा सारख्या संदेहास्पद सुखाचे प्रसंग दोघांवरहि गुदरले, कविता दोघानींहि केल्या, देव दोघांनाहि दिसले, संत म्हणून कीर्ति दोघांचीहि झाली. शिवाजी सारख्या शाहाजोग व मातबर राजाशीं संबंध दोघांचाहि आला व त्या संबंधापासून



टसठशीत लाभ करून घेणें साधुत्वाच्या कीर्तीपायीं दोघांसहि जमलें नाहीं. तथापि तुकाराम व रामदास ह्या दोघांच्याहि आयुष्यांतील उत्कट सुखाच्या क्षणाविषयींचें श्रेय शिवबाराजासच दिलें पाहिजे. शिवाजीनें पाठविलेल्या अलंकाराच्या नजराण्यातील भरघोस नथेची कडी मुलुखमैदान बायकोच्या तोंडास बसताच निःशब्द शांततेचे जे चार दो क्षण दुर्दैवी तुकारामबुवास लाभले, तोच त्याच्या इहलोकावरील आयुष्यातला ब्रम्हानंदाचा काळ असेल! आयुष्यांत प्रथमच (दागिन्याच्या भारानें) नम्र होऊन तोंडास स्मिताची (व नथेची) खीळ घालणाऱ्या आणि नवऱ्याविषयीं कांहीं पळें बरें मत करून घेणाऱ्या जिजाउच्या तोंडास नथ्यानें बत्ती देऊन दुःखाचे पर्वत पुनश्च आपल्यावर कोसळून घेण्याचें सर्व श्रेय तुकारामबुवांच्या साधुत्वास आहे! फटिंग आयुष्य, देवसेवेचें व देशसेवेचें खडतर व्रत, कपडयाचा अभाव, अजाण वयात बोहोल्यावरून पळ काढल्यामुळें वाट्यास आलेलें वैराग्य ह्यांना कंटाळून अखेर "**करुणाष्टके**" म्हणावयास लागलेल्या **रामदासस्वामींनाहि शिवबाराजांनीं** अकल्पित आनंदाचा असाच अनुभव दिला होता! राज्यकारभारास विटलेल्या शिवबानें वैराग्याच्या अकस्मिक झटक्यात स्वामींच्या झोळींत चकचकीत स्वराज्याच्या सनदा टाकल्या! तो जिरे टोप, ते आगभर कपडे, तीं वाघनखें, त्या सहा बायका, आणि ती राज्यकारभाराची भानगड, ह्या साऱ्याचाच त्याला वीट आला होता. व वैराग्याचें सुटसुटीत आयुष्य त्याला अतिशय लोभनीय वाटूं लागलें होतें. बहुधा त्याच क्षणीं रामदासांनाहि विरागी आयुष्य नकोसें झालें असणें अगदी संभवनीय आहे. त्या काजीशीं केलेल्या मारामाऱ्या, ते वाढलेले केस, ते मारुतीसारख्या सदैव गदा उभारून उभ्या असलेल्या गांवा बाहेरच्या फटिंग दैवताचीं देवळें बांधणें—काय अन् काय! गादीवर बसून मुकुट घालण्याची कल्पना अगदींच कांही वाईट नव्हती! त्या कल्पनेचा उत्कट आनंद रामदासांनीं झोळीतील सनदा चांचपीत कांहीं

काळ मनमुराद उपभोगिला आणि मग त्याच्या साधुत्वानें व व्यवहार बुद्धीने पुन्हा मात केली. समजा, सिंहासनाचा आपण खरोखरच स्वीकार केला. आणि ह्या वाघनखवाल्या चतुर पुरुषाची लहर त्यामुळे पुन्हा फिरली तर घेता काय! त्याच्या वैराग्याची तर परिक्षा व्हावयाचीच पण आपल्याहि व्हायची, आणि जन्मभर मिळवलेली कीर्ति क्षणांत धुळीला मिळायची! नाही तरी खरें सुख उपभोगण्यापेक्षा कल्पनेंतच आहे!

आणि असाच सूज्ञ विचार करून काल्पनिक राज्याचा आनंद भोगण्यासाठी स्वामींनी शिवाजीला आपला प्रतिनिधी नेमला असेल व हिंपुटी झालेल्या ओढाळ मनाला चार समजुतीच्या गोष्टी सांगण्यासाठीं पुन्हा लेखणी सरसावून त्यानी ललकारी मारली असेल—"**जगीं सर्व सुखी असा कोण आहे?**"

* * *

आणि रामदासानी जगापुढें मारलेलें अलंकारिक प्रश्नचिन्ह व तुकाराम महाराजांनी काढलेले तात्पर्यात्मक उद्गार चिन्ह जवळपास अनादि, अनंत व अटळ आहे. जिंकावयास जग बाकी उरलें नाही म्हणून दुःखाने हंबरडा फोडणारा विजेता, व डोकें टेकावयास कोठे जागा उरली नाही म्हणून कष्टी झालेला मुंबईकर, ह्याच्या दुःखाच्या केवळ प्रकारात भेद आहे. तीव्रतेंत नाहीं. संततीच्या अतिरेकानेंहि माणसें दुःखी होतात व संततीच्या अभावानेंहि तीं दुःखी होतात. नवरे फार झोडपतात म्हणून रडणाऱ्या बायका आहेत तशाच नवरे झोडपत नाहींत म्हणून झुरणीस लागलेल्या ललना आहेत. रूपवती भार्येचा घरधनी आपल्या परीनें घोरांत असतो, कुरुपवती भार्येचा नाथ आपल्या परीनें चडफडत असतो, व दशक न्यायास पुरेपूर उतरणाऱ्या सामान्य सुंदरीचा पति आपल्यापरीनें अस्वस्थ असतो. जाकोबाबादचे रहिवासी उन्ह आहे म्हणून तळमळतात, ॲबटाबादचे रहिवासी थंडी आहे म्हणून दात खातात, चेरापुंजीचे रहि-

वासी पाऊस आहे म्हणून कोकलतात व मुंबईचे रहिवासी कांहींच नाहीं, किंवा सर्वच आहे, म्हणून सर्द असतात. दुःख करण्यासाठीं टपून बसलेल्या ह्या जगात मोलकरणीला मास्तरणीचा हेवा वाटतो, मास्तरणीला हेड-मास्तरणीचा दुस्वास वाटतो, हेडमास्तरणीचें पोट इन्स्पेक्टर बाईला पाहून दुखूं लागतें, इन्स्पेक्टर बाई सरदारणीकडे बघून झुरते, सरदारणीला संस्थानिकांच्या बायकोकडे पाहून बेचैनी येते, व अनेक ठिकाणीं जखडली गेलेली संस्थानची मलका दुःखाच्या संपूर्ण वर्तुळाचा फेरफटका मारून परत मोलकरणीच्या स्वतंत्र आयुष्याकडे पाहून उसासे सोडून मनाचे श्लोक म्हणते, किंवा रेडिओ लावते !

* * *

तुम्ही कुणालाहि विचारून पहा ! तुमच्या तत्काळ अनुभवाला येईल कीं जगात सर्वतोपरी सुखी असा तर कुणी नाहींच, पण कोणत्याच परीनें कुठें कुणीच सुखी नाहीं ! सर्वतोपरी दुःखात असणाऱ्या मानव-प्राण्यानीं हें जग नुसते गजबजून गेलें आहे ! कारण जें ज्याच्याजवळ आहें, तें त्याच्याजवळ नसतां दुसरेंच काहीं त्याच्याजवळ असावं असं प्रत्येकाला वाटतं ! आणि ज्याच्याजवळ जें नसताना ज्याला जें सुख वाटत होतें, तेंच त्याच्याजवळ येता क्षणींच दुर्दैवाची कांडी फिरल्याप्रमाणें त्याला तें दुःख वाटूं लागतें ! लठ्ठ माणूस आपण रोड झाल्यास सुखाच्या हिमालयावर सहज चढून बसूं अशा कल्पनेनें निष्कारण उपासतापास करूं लागतो, गवतकाडी खातो. भाजीपाला चरतो, व सुखाचा जीव निष्कारण दुःखात टाकतो. लठ्ठ माणूस रोडपणाचा रस्ता काटण्याचा प्रयत्न करीत असतां रोड माणसाचा मात्र अगदीं उलट्या दिशेनें खटाटोप चाललेला असतो. रोडपणाच्या कल्पनेनें तो अधिकच रोड होतो, व लठ्ठ होण्याच्या प्रयासांत अगदीं उलट्या प्रतीची कमाई करण्यांत यश मिळवून

जास्तच दुःखी होतो. अशी कल्पना करा कीं धावणें, पोटाचे व्यायाम करणें, बीटरूट खाणें, अन्न तोडणें, भाला फेकणें, बोथाटी फिरविणें, बियर पीणें, झोपा काढणें, लग्न करणें, इत्यादि संमिश्र अनुपानाचा परिणाम होऊन गलेलठ्ठ माणूस रोड झाला, व रोड माणूस गलेलठ्ठ बनला तर त्यांचा आत्मा शांत होईल काय ? गोष्ट कशाला ? आतां ते आपला मोहरा पुन्हा उलट्या दिशेनें फिरवितील व छाती पिटून आपल्या नव्या दुर्दैवाविषयीं दुःख करूं लागतील ! लठ्ठ झालेला माणूस पुन्हा रोड होऊन सुखाच्या स्वर्गात प्रवेश करण्यासाठीं खटाटोप करील व रोड झालेला माणूस पुन्हा लठ्ठ होण्यासाठीं जीव पाखडील ! असें हें गांजलेल्या मनुष्यजातीच्या दुःखाचे विलक्षण त्रांगडे आहे !

* * * *

नुकतीच मला एक विदुषीबाई भेटली होती. स्त्रीजातीच्या हिंदू पोटविभागाचें दुःख हा त्या विदुषीबाईचा आवडता विषय होता. हिंदू स्त्रियांची जातच्या जात दुःखसागरात सारख्या गटांगळ्या खात असून त्यांच्या आयुष्यात कुठें प्रकाश किंवा वारा नाहीं, असें तिचें ठाम मत दिसलें. "पीडित" "पद दलित" "शृंखलाबद्ध" ह्यापैकीं एखादेंतरी विशेषण वापरल्याशिवाय हिंदू स्त्रियाचें नाव घ्यायला ती मुळींच राजी नव्हती. ज्यांच्या आयुष्यात वारा किंवा उजेड अथवा दोन्ही भरपूर आहेत, व ज्याच्या पायात शृंखला नाहींत, किंवा ज्या कुणाच्याहि पायाखालीं तुडविल्या गेल्या नाहींत, ( उलट नवऱ्याना तुडविणें हाच ज्याचा दैनिक व्यायाम आहे ! ) अशा हिंदू स्त्रिया आजहि बऱ्याच आहेत, व पूर्वींहि बऱ्याच होत्या, असें मी तिला परोपरीनें सांगून पाहिलें. पण रामाचें नाव ! तिची कांहीं केल्या निश्चिती पटेना. अखेर तिच्या माझ्यांत पुढील संवाद झाला—

मीः—अहो पण पुरुषांनीं तुमचं येवढं केलं तरी काय !

विदुषीः—काय केलं ! काय केलं नाहीं तें विचारा ! पुरुष हेच स्त्रियांच्या दास्याचं मूळ कारण आहे ! तें कारण नष्ट होईल तो दिवस सोन्याच्या अक्षरांनीं लिहिला जाईल !



मी:—अहो पण विदुषीबाई, पुरुष नष्ट झाले, तर स्त्रियांचं दास्य नष्ट होईल हें खरं, पण स्त्रियाहि नष्ट होतील ना ? तीं सोन्याचीं अक्षरं काढायला कुणी हयात राहील अशी तर आधीं व्यवस्था करा !

विदुषीः—ज्या जगांत पुरुष आहेत, त्या जगांत स्त्रियांना सुख लागणं शक्य नाहीं !

मी:—अहो पण विदुषीबाई, सगळे पुरुष निकालांत निघाले, तर हयात असलेल्या बायकांच्या शेवटच्या पिढीला अंधारांत सोबत कोण करील ? या बापड्या कुणामागें पिरपिर लावतील ? आपल्या दुःखाची जिम्मेदारी मग त्या कुणावर लोटतील ? झुरळांपासून त्यांचं रक्षण कोण बरं करील ?

विदुषीः—तें आमचं आम्ही पाहून घेऊं ! पुरुषापेक्षां झुरळं बरीं ! ज्या पुरुषांनीं आम्हांला शृंखलाबद्ध केलं, ज्यांनीं बालविवाह जारी केले,

जे दोन तीन लग्नं करतात., ज्यांनी आपल्या जातभाईच्या धंद्याला उत्तेजन देण्यासाठीं वपनाची युक्ती काढून आमची विटंबना केली, ज्यांनीं लग्न संस्थेच्या जाळ्यात आम्हांला गुंतवलं, ज्यांनीं अज्ञानांधकारात आम्हाला धडपडत ठेवलं, त्यांच्या पापाला एकच प्रायश्चित्त आहे !

**मीः**—अहो पण आमच्या बरोबर ते प्रायश्चित्त तुम्हालाहि आपोआप मिळेलना ! तुम्ही आहात कुठे विदुषीबाई...... ?

**विदुषीः**—मी दास्यात आहे ! आम्ही मान्याजणी दास्यात आहोत ! दलित हिंदू स्त्रियांची दुःखं, त्यांच्या आपदा, त्यांच्या यातना... वाऱ्याशिवाय–प्रकाशाशिवाय ज्या जुलमी पुरुषांनीं त्यांचा कोंडमारा केला...... !!!

त्या बाईचं समाधान करणं मला शक्य झालं नाहीं. कुणालाच होणार नाहीं. दुःख करण्यासारखं स्वतःच्या विषयांत फारसं कांहींच नसल्यामुळें हिंदू स्त्रियांची दरोबस्त काल्पनिक दुःखं तिनें दत्तक घेऊन टाकलीं आहेत. दुःखाच्या दलदलींत अगदीं लोटपोट होऊन जाणं हाच मुळीं तिच्या आयुष्यातला शाही आनंद आहे. तिची दुःखभावना हिरावून घेतली तरच कदाचित् ती खरोखरच दुःखी होईल. “ **आनंद सोपान** ” “ **सुखाच्या बारा वाटा** ” “ **वारा व उजेड** ” आदि खास स्त्रियासाठीं लिहिलेल्या ग्रंथाच्या त्या जननीचं कसलंहि समाधान करणं म्हणजे तिला यातनेच्या खाईत लोटून देणें होय ! पुरुष जातीच्या मनोमन माना मारून स्त्रियासाठीं उसासे सोडणं ह्याच दुःखाच्या मस्त आनंदांत तिच्या जिवाला खरा आराम आहे !

* * *

विलायतेंतील कोंदट वातावरणात फारच कुचंबणा झाल्यामुळें भारतवर्षांत अम्मळ हवाखोरीला आलेल्या एका गौर युवतीच्या संदर्भातील

सुख दु:ख विषयक कल्पना फारच भिन्न होत्या. विदुषीबाईच्या मुलाखतीच्या धक्क्यांतून जेमतेम सावरत असतां तिच्या आणि माझ्या दरम्यान पुढील वाक्यांची देवाण घेवाण झाली:—

मी:—कसा काय वाटला आमचा हिंदुस्थान ?

ती:—O-O-Oh ! It is lovely ! किती उजेड ! किती वारा ! किती भाग्यवान स्त्रिया !

मी—भाग्यवान स्त्रिया ? काय म्हणतां काय ?

ती:—प्रत्येक मुलीला इथें नवरा मिळू शकतो ! बिचारे पुरुष पोरींच्या सोयींसाठीं चार दोन बायका जास्त करायलाहि कुरकुरत नाहींत !

मी:—चार दोन बायका करणें ही सोय !

ती:—नाहीं तर काय ? आमच्या इथे चार बायकाना मिळून एक नवरा मिळाला तरी बहार होईल ? अजून आमच्या जुलमी आणि मागासलेल्या देशांत एकपत्नीत्वाचा जुनाट कायदाच जारी आहे !

मी:—एक पत्नीत्व जुलमी ?

ती:—तर काय हो ! लढाईमुळें पुरुष आणि चॉकोलेट सारखींच दुर्भिळ झाली आहेत आमच्या देशांत ! नुसता बायकाचा बाजार आहे !

मी:—आमच्या विदुषीबाईंना तसंच व्हायला पाहिजे आहे !

ती:—विदुषीबाई ? कोण विदुषीबाई ?

मी:—आहे एक अशीच, पुरुष जिवंत आहेत म्हणून मरगळलेली बाई ! जिभेला धार लाऊन सगळ्या पुरुषाची कत्तल करायचा तिचा विचार आहे !

ती:—Oh-Silly-The Silly goose !

मी:—विदुषीबाई Silly goose !

तीः—अर्थात् !

मीः—पुरुषांनीं चार बायका करणं हा अन्याय नाहीं ?

तीः—न करणं हा अन्याय आहे ! येवढचं काय पण विलायतेंत बाल विवाह तावडतोब सुरू झाले पाहिजेत !

मीः—काय म्हणतां ?

तीः—म्हणजे मुळींच लग्न न करून बायकांची कुचंबणा करणाऱ्या वृत्तीला बराचसा आळा बसेल ! लंडनच्या " Women Only " त तशा अर्थाचा एक लेख लिहिणार आहे मी !

मीः—लिहाल तें खरं ! पण आमच्या विदुषीबाई म्हणतात, कीं जिथें वपन आहे-

तीः—वपन ? म्हणजे Shingle-गोटा ? मुसलमान पुरुषांनीं ती सवलत आपल्या बायकाना अवश्य दिली पाहिजे ! आमच्याहि देशांत पुष्कळ बायका गोटा करून घेतात !

मीः—पण इथला बुरखा !

तीः—इथल्या धुळीचा विचार करता वस्त्रगाळ हवा मिळण्याच्या दृष्टींन बुरखा फारच उपयुक्त आहे !

मीः—मग इथल्या स्त्रिया भयंकर दुःखांत पिचत पडल्या आहेत असं तुम्हाला वाटत नाहीं तर ?

तीः—कित्ती कित्ती सुंदर साड्या, वेण्या, कुंकू आणि दागिने ! नोकरीची यातायात नाहीं ! विवाहाची भरपूर सोय ! नाहीं तर आम्ही अमेरिका शोधायला निघालेल्या कोलंबसप्रमाणें नवरे आणि नोकऱ्या धुंडत फिरतो ! स्त्रियांच्या सुखाचा स्वर्ग कुठें असेल तर तो ह्या भरपूर प्रकाशाच्या इंडियांत !

पूर्व आणि पश्चिमेकडील ह्या दोन विदुषी स्त्रियांच्या सुखविषयक कल्पनेंत पूर्व आणि पश्चिमे इतकेंच अंतर असलेलें पाहून माझी अगदीं निश्चिती पटली कीं सुख ही केवळ एक काल्पनिक अवस्था आहे, आणि दुःख करण्याचा आपला दुराग्रह नसता, तर आपण पुष्कळसे सुखी झालों असतों. झरळाचें रायते खाणाऱ्या एखाद्या दुमटलेल्या पायांच्या चिनी ललनेस पाहून आपणांस कदाचित् कांपरे भरेल पण तिच्या दर्शनानें चपट्या तोंडाच्या पिवळ्या तरुणांचे तांडे मात्र हर्षोत्फुल्ल होतील ! " जॉन " " बॉब " किंवा " डिक " असल्या एकेरी हाकेनें फिरंगी नवऱ्याचा जीव सुखावून जाईल पण स्त्री एकेरीवर येऊन एखाद्या आर्यपुत्रास " शंकर " " किंवा " हरी " म्हणून संबोधूं लागली तर त्याच्या अंगाचा भडका उडेल. एका समान क्रियेच्या भावनात्मक प्रतिक्रिया इतक्या विरोधी होऊं शकनात, ह्याचा अर्थ स्पष्ट आहे. कुणी आपल्या जातीचीं, कुणी अखिल स्त्रीजातीची, कुणी साऱ्या मनुष्य जातीचीं, दुःखें नाहींशीं करण्यासाठीं जिवापाड धडपडत असतात. मनुष्य जातीचीं दुःखें नष्ट करण्याचा तर आजपर्यंत अनेक महापुरुषानीं प्रयत्न केलेला आहे. परंतु पहावें तों त्या विषयात खटपटी माणसाचे सर्व प्रयत्न वाया गेले. प्रयत्नवादी महाभागच स्वतः भग्नहृदय व दुःखी बनले, आणि मनुष्यजात मात्र होती तितकीच सुखी किंवा दुःखी राहिली. आणि ती तशीच राहणार. कारण तसेंच राहण्याची तिची इच्छा आहे. जें कधीं नव्हतेंच, किंवा जें केवळ कल्पनेंत होतें, त्याचा कोण कसा नाश करणार ? " अगा जें जाहलेंच नाहीं, त्याची वार्ता पुससी काई ? मनुष्याची कल्पनाशक्ति जितकी अमर्याद आहे, तितकीच त्याची सुख न लाऊन घेण्याची इच्छा अमर्याद आहे. जेथें दलितांचें राज्य झालेलें आहे, ( व राज्यकर्ते दलित बनले आहेत ! ) जेथें शेतकरी व मजुरांची कोणी पिळणूक करीत नाहीं ( तर उलट जेथें मजूर व शेतकरीच इतरांची पिळणूक करतात ! ) जेथें समाजांतील

मध्यमवर्ग नष्ट झाला आहे, स्त्रीपुरुषांतील कृत्रिम (?) भेद लयास गेला आहे, जेथें कोणी उपाशी नाहीं, जेथें कोणी बेकार नाहीं, जेथें केवळ अपचन हाच एक रोग् अस्तित्वात आहे, जेथील जनतेची पहिली, दुसरी, तिसरी, व अंकगणिताच्या आवांक्यांतील इतर प्रत्येक भूक भागविण्याची योग्य व्यवस्था झालेली आहे, जेथें प्राथमिक, मध्यम किंवा अंतिम गरजेच्या पीडेपासून "जनसमूह" सर्वस्वी मुक्त आहे, तेथें—त्या समान संधीच्या देशांत, सुखाचा प्रळय माजला असेल, तेथें सुखाचाच पाऊस असेल व सुखाचेंच उन्ह असेल, सुखाचाच वारा असेल, अशी अपेक्षा करावयास फारशी हरकत नसावी, परंतु–!......?

"समान संधीच्या सुवर्ण देशातील तरुणा! कुशल तर आहे ना?"

"बिलकुल नाहीं!"

"पुरेसें खावयास, प्यावयास, व झोपावयास मिळत असता आतां तक्रार कसली बरें?"

"जनावरेंहि ह्या साऱ्या गोष्टी करतात!"

"आमच्या देशातील अर्धपोटी कामकऱ्याचें हें छायाचित्र पहा व मग बोल!"

"ह्या कामकऱ्याचा चढाऊ जोडा व लप्फेदार पागोटें फारच नाविन्यपूर्ण आहे! असा जोडा व पागोटें न घालता पोटभर जेवण्यापेक्षा असा जोडा व पागोटें चढवून अर्धपोटी मरणें फार सुखाचें!"

"तुझें म्हणणें तरी काय?"

"ह्या जबरदस्तीच्या सारखेपणाचा आम्हांला वीट आला आहे! ह्यापेक्षां रंगीबेरंगी विषमता अधिक आनंददायक!"

" तर मग तुला सुख तरी कशानें लागेल ? " " आमच्या ह्या रुशिया देशांतील कुंठित, कुचंबलेल्या साचेबंद जीवनाच्या ठिकऱ्या उडविणाऱ्या क्रांतीनें ! "

——म्हणूनच मी म्हणतों कीं माणसाची कल्पना शक्ति जितकी अमर्याद आहे, तितकीच त्याची नवीं नवीं खुसपुटें काढून पुनः पुनः दुःखी होण्याची व ऊर बडविण्याची शक्तीहि अनंत आहे ! ह्या दुःखाच्या कल्पनिक रोगास उतारहि केवळ कल्पनेचाच असूं शकेल. आपणाजवळ जें नाहीं तें आपणाजवळ आहे अशी कल्पना करीत गेल्यास सुखदुःखाच्या ह्या दुर्धट रोगास बराच उतार पडेल व कल्पनेच्या प्राणांतिक व्यायामामुळे अखेर सुखदुःखापलीकडील शून्य प्रदेशात आपणास बेशुद्धीची चिरशांति लाभेल !

प्राकृत जनास पटेल व परवडेल असा सर्व जातीच्या दुःखावर आणखीहि एक रामबाण उपाय आहे. आपण मोठे अभागी आहोंत, किंवा आपणावर एखादें दुःख कोसळले आहे किंवा कोसळण्याच्या बेतात आहे अशी नुसती शंका येताच त्याहिपेक्षा अक्राळविक्राळ दुःखाची भेसुर कल्पना करून, तें दुःख आपणावर कोसळलें नाहीं, किंवा कोसळण्याच्या बेतांत नाहीं, ह्याविषयीं परमेश्वराला आपण धन्यवाद द्यावेत व आनंदानें नाचत सुटावें ! समजा कीं आपणांस विंचू चावला ! तर आपण काय करावें ? दुःखाच्या किंकाळया फोडाव्यात काय ?—नाहीं। उलटपक्षीं आपणांस विंचवाऐवजीं दहा क्रमांकाचा नाग डसला नाहीं किंवा बंगाली वाघानें आपलें मानगूट पकडलें नाहीं, ह्याविषयीं आपण उत्सव केला पाहिजे. खेळाडू वृत्तीच्या एखाद्या चोरानें सहज आपला खिसा कापला तर सारा दिवस सुतकी चेहरा करून बसण्याचा आपला रिवाज असतो. परंतु चोरानें केवळ आपला खिसाच कापला, गळा कापला नाहीं, असा विचार करतांच

आपणांस आनंदाच्या उकळ्या फुटूं लागतील. एखाद्याचा पाय मोडल्यास त्यानें जन्मभर कष्टी राहण्याचें वास्तविक कांहींच कारण नाहीं. दुःखाचें सुख करण्याचा हा मार्ग नव्हे. आपला पाय मोडला असला तरी आपला हातहि तितक्याच सहज मोडूं शकला असता, व मानहि शाबूत राहण्याचें कांहींच कारण नव्हतें, असा विचार त्यानें करावयास पाहिजे. येऊन ठेप-लेलें कोणतेंहि दुःख असें नाहीं कीं, ज्याचा कल्पनेच्या भिंगानें थरकाप उडविणारा विस्तार करतांच मूळचें दुःख माणसास केवळ नगण्य वाटणार नाहीं !

आपल्या बायकोचें नाक नकटें आहे व तोंड फाटकें (लाक्षणिक अर्थानें!) आहे, म्हणून आमचा मित्र शिशिरकुमार फार दुःखी असतो. पण ती नुसती नकटी असण्याच्या ऐवजीं चपटीहि असती, लंगडीहि असती व तिच्या तोंडावर देवीचा प्रसाद पडून ती अजिबात मुकी झाली असती तर सौंदर्योपासक तरुण शिशिरकुमार ह्यानें काय केलें असतें ? पण नाहीं. हा विचार गुलछबू गृहस्थ शिशिरकुमार ह्याला कधींहि सुचावयाचा नाहीं. आपल्या बायकोचा उत्तम बांधा, पुष्कळसे केस, वर्ण ह्याविषयीं त्या जगन्नियंत्याला धन्यवाद देण्या ऐवजीं तो तिच्या बसक्या नाकाच्या नांवानें खचून जाईल.

गोपाळरावांच्या मुलानें प्रेमविवाह केला आहे व तो आजकाल पांढऱ्या विड्या ओढतो, ह्याविषयीं त्यांस प्राणांतिक दुःख होतें. अरे पण कां ? प्रेमविवाह करण्या ऐवजीं त्या तरुणानें आजन्म ब्रम्हचर्याची "शप्पत" घेतली असती तर ? तर काय त्याच्या हातून थोडकें पाप झालें असतें ? ओढतो तर ओढतो पोरगा पांढऱ्या शिग्रेटी ! तो चरस, गांजा, अफीम अथवा मदिरा, ह्यांचें सेवन करीत नाहीं, ही काय लहान गोष्ट झाली ? पण मुलाच्या विषयांत कसलें तरी दुःख करण्यांतच आनंद मानणाऱ्या गोपाळ-

रावांना हा सुखाचा वैचारिक राजमार्ग कधीं सांपडावयाचा नाहीं! गोपाळ-रावांची गोष्ट कशाला! दारा, सुजा, मुराद, औरंगजेब आणि मंडळीं त्यांच्या भानगडींत अखेर शहाजहानाची जी काय वासलात लागली, तिचें चित्र जोवर भरतवर्षांतील मातापितरें आपल्या हृदयावर खोदून ठेवित नाहात तोवर त्यांना सुख लागण्याचा कांहींच संभव नाहीं.

परंतु ही परिस्थिती इष्ट अथवा सुखदायक नव्हे. आपला नवरा कळपांतून दररोज उशीरां घरीं परत येतो ह्याविषयीं तळहातावर हनवटी टेकून उसासे सोडावयाचें भामिनीबाईंना कांहींच कारण नाहीं. त्यांनीं असा विचार करावयास पाहिजे कीं शरमिंदेपणें मान खालीं घालून परत येण्याऐवजीं "पांढऱ्या घोड्यावर" ("White Horse") विलायती मद्यविशेष ) स्वार होऊन आपला नवरा फुसांडत घरीं परत आला असता, व आपल्याशीं झोंबड करून आपल्या मंगळसूत्रावर हल्ला करण्याचा रिवाज



सुधाकराप्रमाणें त्यानें ठेवला असता तर! हें जोपर्यंत होत नाहीं व जोंवर धैर्यधररावांची गलितधैर्य मान पडलेल्या सिमलासारखी लोंबत आहे व भामिनीबाईंचे डोळे ताठपणें अस्मानांत व हात कंबरेवर आहेत, तोंवर त्यांना कष्टी होण्यासारखें खरोखरच काहीं झालेलेंच नाहीं. पण नाहीं! भीषण भवितव्यतेच्या अमर्याद पण अघटित कर्तृत्वाविपर्यीचा हा परमसुखदायक विचार भामिनी काकूंना कधीं सुचावयाचा नाहीं. काळ्याकुट्ट रात्रीं नवानंतर घड्याळाचे काटे जसे जसे पुढें जाऊं लागतील तसा तसा त्याच्या हृदयातील शोक, संताप ह्याचा सागर काळ्या पाढऱ्या लाटा उडवीत थैमान घालूं लागेल!

परंतु आम्ही पुनश्च एकदा म्हणतों कीं ही परिस्थिती स्पृहणीय नव्हे. दुःखाच्या कल्पनेस कल्पनेंतल्या दुःखानें नामोहरण करणें हेंच सुखदुःखविवेकाचें व्यवहार्य सार होय. आपणांस दुःखी करण्या-साठीं टपून बसलेल्या साऱ्या पापी शक्तींची त्रेधा उडविण्याचा ह्याहून अधिक रामबाण उपाय उपलब्ध होणें कठीण! जिज्ञासूंनीं व मुमुक्षूंनीं पुढील काहीं मासलेवाईक उदाहरणें मार्गदर्शनासाठीं मनन करावींतः—

(१) आम्हास डोके दुखीचा विकार जडला. केवढी आनंदाची गोष्ट कीं आम्हास कॅन्सर अथवा महामारी झाली नाहीं? पुष्कळांना तीं देखील होतात.

(२) धोब्यानें कपडे फाडले. कांहीं पर्वा नाहीं! त्यानें आजिबात सगळे कपडे हरवूनच टाकले असते तर!

(३) धोब्यानें एकूण एक कपडा हरवला. अहो भाग्यम्! एरवी सूर्य किरणांतील पौष्टिक द्रव्यें दिगंबर देहानें सेवन करण्याइतकें धैर्य आम्हांस कुठून आलें असतें! केवढा हा भाग्यशाली योग!

(४) अतिवृष्टी होऊन पिकें बुडालीं. पण अतिवृष्टीबरोबरच भूकंप व ज्वालामुखी ह्यांचे उद्रेक होऊन शेताच्या जागीं अजिबात सरोवर उत्पन्न झालें नाहीं, ही दैवाची केवढी कृपा !

(५) आड रस्त्यावर आगगाडीचा चोवीस तासांनीं खोळंबा झाल्यामुळें महत्वाचीं कामें निकालांत निघालीं. पण दोन गाड्यांची टक्कर न झाल्यामुळें जीव बचावला हे प्रभूचे केवढे उपकार !

(३) मुलगा घरातून पळून गेला ! पण आईबापाना वळचरांत लोणच्यांच्या बरण्याशेजारीं बंद करून स्वतःच सर्वाधिकार ग्रहण करण्याचा प्रयत्न त्यानें केला नाहीं हें स्तुत्य नव्हे काय ?

—इत्यादि—इत्यादि

—आदेश, दिवाळी १९४६

---

# कांहीं शब्द आणखी कांहीं शब्द

★ 'खंडाळयाचा' म्हटलें म्हणजे ज्याप्रमाणें 'घाट' हा शब्द आठवावयाचा किंवा 'नटीचा' म्हटलें म्हणजे ज्याप्रमाणें 'नवरा' हाच शब्द आठवावयाचा, तसे कांहीं शब्दांचे व कांहीं अन्य शब्दांचे घनिष्ठ संबंध उत्पन्न झाले आहेत. तसें म्हणाल तर त्या दोन शब्दांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नसतो. सामासिक बंधनानें कांहीं ते एकत्र बांधलेले नसतात. एकाचें दुसऱ्याविना मुळींच अडण्यासारखें नसतें. कोणताहि एक शब्द आल्यावर, पतीच्या पावलावर खालच्या मानेनें पावलें टाकीत जाणाऱ्या पुरातन पत्नीप्रमाणें (किंवा पत्नीच्या पावलावर मुकाट पावलें टाकणाऱ्या आधुनिक पतीप्रमाणें, असें वाटल्यास -म्हणा !)



त्या दुसऱ्या शब्दानें त्या पहिल्या शब्दामागोमाग आलेंच पाहिजे, असा कांहीं कोठें निर्बंध नसतो. तरीहि घडतें मात्र असेंच ! कांहीं शब्द उच्चारले जातांच, शकुंतलेशीं लगट करणाऱ्या भुंग्याप्रमाणें, कांहीं अन्य शब्द दत्त म्हणून त्यांच्या पाठोपाठ आपल्यापुढें उभे राहतात. प्रयत्नानींहि त्यांना हटविणें आपणास शक्य होत नाहीं. जसें लोकल गाडींत गर्दीनें मुसंडी मारणाऱ्या कोळणीस किंवा दूधवाल्यास हटविणें आपणांस शक्य होत नाहीं, जसें सुंदर मुलीची पाठराखण करणाऱ्या तिच्या शेंबड्या भावास हटविणें आपणांस शक्य होत नाहीं, जसें उत्कृष्ट वक्त्यास अनिवार्यपणें बिलगलेल्या कंटाळवाण्या अध्यक्षास आपणास 'वारता' येत नाहीं, तसेंच कांहीं शब्दांचे व आणखी कांहीं शब्दांचे अवैध पण अटळ, अनैर्बंधिक पण अनिवार्य, असे संबंध उत्पन्न झाले आहेत.

आतां 'खंडाळ्याचा' हा शब्द आपल्या ओठावर स्फुरतो न स्फुरतो तोंच बॉम्बफेकीच्या गतीनें सारा 'घाट' आपल्या मस्तकावर कां कोसळावा ? पण तसें होतें खरें ! 'खंडाळ्याचा' म्हटला म्हणजे तो 'मार्ग' नव्हे, 'डोंगर' नव्हे, 'कातकरी' नव्हे किंवा 'करवंदेंविकऱ्या' नव्हे ! 'खंडाळ्याचा' म्हटला म्हणजे ' घाट ' च ! ह्या दोहोंचें साहचर्य नागपूर आणि संत्रीं, चौपाटी आणि भेळ, किंवा 'समाजस्वास्थ्य' व नागवें चित्र ह्याच्याइतकें आपल्या मनांत खोल रुतून बसलें आहे. तीच गोष्ट नटीच्या नवऱ्याची ! नटींना केवळ नवरे किंवा तत्सम संबंधी तेवढे असतात अशांतला मुळींच भाग नाहीं. त्यांना आई, बाप, भाऊ, दिग्दर्शक, आत्या, निर्माता, पणजी, पुंजीपती, तोंडें रंगविणारा अशीं कितीतरी निकटचीं माणसें असतात, परंतु 'नटीचा' ह्या शब्दामधील अन्त्याक्षराचा उच्चार संपण्यापूर्वीच आपल्या डोळ्यां-समोरून एक केविलवाणी मूर्ति लळतलोंबत जाते. ती मूर्ति त्या नटीच्या आज्याची, पणज्याची, खापरपणज्याची किंवा प्रियकराची नसते. ती

तिच्या नवऱ्याची मूर्ति असते. बस्स ! 'नटीचा' म्हटला म्हणजे 'नवरा' च ! तिचा शाब्दिक पाठलाग करण्याचा अखत्यार त्यालाच पोहोंचतो ! दुसरें कोठें नव्हे तरी निदान येथें तिला येवढें खेटून येणें हा केवळ त्याचाच अधिकार ! प्रत्यक्षांत नटीमागून तिचा नवरा आलाच पाहिजे असें मुळींच नव्हे; उलट तो तसा आला तर तें आश्चर्य व अडचण मानली जाईल. वास्तवात साऱ्या जगाचे नटीशीं जिव्हाळ्याचे संबंध असतील, पण नवऱ्याचे असणार नाहींत; परंतु शब्दापुरतें पहाल तर आपल्या मनानीं त्या दोघाचे अगदीं विच्छेदातीत संबंध जोडून दिले आहेत. तें कांहीं नाहीं ! 'नटीचा' म्हणजे मग तो 'नवरा'च ! आपलें नीतिमान् व आदर्शवादी मन जंग जंग पछाडले तरी दुसऱ्या कोणाशींहि तिचा शाब्दिक संबंध जोडावयास सिद्ध नसतें. 'खंडाळयाचा' म्हणजे जसा 'घाट'च, पाणवठा नव्हे, तसेंच 'नटीचा' म्हणजे 'नवराच' ! दत्तक पुत्र नव्हे !

दोन किंवा अधिक शब्दाचे असेच आणखी कित्येक अभेद्य व अभंग मंच उत्पन्न झाले आहेत. हे संबंध इतके बळकट आहेत कीं एक वेळ कोंडाण्यावरून यशवंती घोरपडीला ओरबाडून काढता आलें असतें, उत्साही काव्यगायकाला व्यासपीठावरून ढकलून देतां आलें असतें, चितेवर चढणाऱ्या पद्मिनीचें मन पुनर्विवाहासाठीं वळविता आलें असतें, परंतु ह्या शब्दाच्या जोड्या फोडणें, मूर्ति फोडावयास संवकलेल्या कोणत्याहि घोरीगझनीला किंवा बाहुल्या फोडावयास सरावलेल्या कोणत्याहि अर्वाच्य पोरट्याला शक्य झालें नसतें.

आतां 'देशाचें' हा शब्द उच्चारताच तुमच्या डोळयासमोर कोणतें चित्र उभें राहतें ? देशांतील सौंदर्याचें काय ? हिमालयाच्या

'लॉँड्रीतील' परीटघडी शिखरांचें काय ? जंतुघ्न पाण्यानें तुडुंब 'भरलेल्या गंगामाईचें काय ? छेः छेः ! तशातला कांहीं एक प्रकार होत नाहीं. देशाचे म्हणजे वैभव नव्हे. देशाचें म्हणजे सौंदर्य नव्हे. देशाचें म्हणजे पावित्र्य नव्हे. देशाचें म्हणजे प्रेम, ऋण, दगड किंवा धोंडे ह्यांपैकीं काहींहि नव्हे. 'देशाचें' म्हणजे 'दुर्दैव' हें आतां अगदीं ब्रह्मलिखित होऊन गेलें आहे. स्वराज्य येवो, इंग्रज जावोत, पण 'देशाचें' म्हणजे 'दुर्दैव'च ! अशोकाचें धर्मचक्र गतिमान् झालें, शनिवारवाड्यात चौघडा-सनई वाजूं लागली, तरी 'देशाच्या' मागचा 'दुर्दैवा'चा लकडा सुटणें काहीं शक्य दिसत नाहीं. 'बा दुर्दैवी हिंद-देशा ! ' 'हा अभागी भारतवर्षा !' 'अरे हतभाग्य आर्यावर्ता !' ह्या चालीवरचीं वाक्यें गेलीं अनेक दशकें सतत आमच्या कानाशीं किंचाळत आहेत. त्यामुळे देशाचा संबंध सौभाग्याशीं, वैभवाशीं किंवा उत्कर्षाशीं जोडणें आम्हास सुतराम् शक्य नाहीं. 'देशाचें दुर्भाग्य,' 'अभागी देश.' 'देशाचें दुर्दैव' ह्याच जोड-शब्दांनीं आजवर आमच्या आसमंतात् सदैव कपाळ पिटले आहे. त्यामुळें 'देशाचे' पार्श्वभूमीवर लगोलग 'दुर्दैवा'चे भयानक पिशाच्च भेसूरपणें थैमान घालतांना आम्हास दिसूं लागतें. 'देशाचे' म्हटलें म्हणजे लागलीच आणि नेहमींच 'दुर्दैव' हें ओढवलेंच पाहिजे. त्याशिवाय आम्हास सुख लाभणार नाहीं. साध्या दुर्दैवाऐवजी कदाचित् 'दारुण दुर्दैव' येईल, किंवा 'भयंकर दुर्भाग्य' येईल. तसें झाल्यास अहोविशेष ! परंतु सुदैवाचा मात्र तेथें गतिमात्र संबंध असणार नाहीं.

आता 'हिंदू स्त्रियांची' ह्या शब्दानंतर कोणी यावें? साडीचोळी, पतिभक्ति, व्रतेंवैकल्यें, वटवट, भुणभुण, तणतण अशापैकीं कुणीहि याव-यास वास्तविक पाहता प्रत्यवाय असूं नये. परंतु तसें कधींहि होणार नाहीं. 'हिंदू स्त्रियांची' म्हटली म्हणजे ती एक तर 'कुचंबणा' तरी असली

पाहिजे किंवा 'कायदेशीर दुर्दशा' तरी असली पाहिजे. पुरुषांच्या कुचंबणेचा मग कुणी विचारच करणार नाहीं. हिंदू किंवा हिंद्वेतर स्त्रियांची झाली असेल त्यापेक्षा त्यांचेकरवीं नाहिंदू व हिंदू पुरुषाची फार अधिक कुचंबणा झाली आहे, होत आहे व होणार आहे त्याचें भान मग कुणीच ठेवीत नाहीं. माता म्हणून बालपणीं पुरुषाच्या पाळण्यास व कानास झोके देणारी, पत्नी म्हणून त्यास क्षणाक्षणाला उठाबशा काढावयास लावणारी व उपवर पुत्री म्हणून त्यास पृथ्वीप्रदक्षिणेस पुरेल येवढी पायपीट घडविणारी स्त्री पुरुषाच्या केवढया दुःखास व कुचंबणेस कारणीभूत होते बरें? कोणत्याहि अवस्थेंत ती त्यास सुख किंवा स्वस्थता लाभूं देत नाहीं. ऐसपैस स्वातंत्र्याचें तर नावच काढूं नका. आयुष्यभर कोण्या ना कोण्या स्त्रीनें किंवा स्त्रियानी त्याला सारखें रंगणावर धरलेलें असतें, घाण्याला जुंपलेलें असतें. तरीहि वाङ्मयीन वहिवाटीस अनुसरून आम्ही मात्र मनाशीं खूणगाठ बाधून ठेवली आहे कीं जेव्हा जेव्हा 'हिंदू स्त्रियाची' गोष्ट निघेल तेव्हा तेव्हा त्याची 'कुचंबणा' किंवा 'कायदेशीर दुर्दशा' ही तत्काळ निदान मनोमन तरी झालीच पाहिजे. मग हें ठरलें. 'पुरुषाची' जशी 'अरेरावी' किंवा पाठभेदाप्रमाणें 'नवरेशाही' अथवा 'जुलूमशाही;' छाती, मिशी, काठी, प्रीति, बिडी, किंवा बायको नव्हे, तशीच स्त्रियांची व विशेषतः 'हिंदू स्त्रियाची' म्हणजे 'कुचंबणाच'! देश व दुर्दैव ह्यांचें साहचर्य जितकें पक्कें तितकीच हिंदू स्त्रिया व कुचंबणा ह्यांची संगतहि पक्की ! अधिकच गडद रंग भरण्यासाठीं वेगळीं विशेषणें किंवा भयानकपणाची चढती भाजणी दाखविणारे समानार्थी शब्द वापरण्यापुरती तुम्हांस मुभा आहे. परंतु हिंदू स्त्रियाची कुचंबणा किंवा कायदेशीर दुर्दशा मात्र कोणी टाळूं बघेल तर तें शक्य नाहीं. 'अध्यक्षमहाराजा'ची पाठराखण करीत जितक्या निश्चितपणें 'सभ्य गृहस्थ' येणार, किंवा 'भाईयों'ची कुचंबणा करीत जशा तत्काळ ' और बहिनो ' धाव-

णार, तितक्याच निश्चितपणें ‘ हिंदू स्त्रियांची ’ गोष्ट निघतांच त्यांची कुचंबना व दुर्दशा ह्या दोघी घाईघाईनें त्यांच्या शद्बकुंडलींत जाऊन बसणार !

‘ रूढी ’ हा दुर्दैवी शद्बहि असाच भयंकर संगतींत कायमचा डांबला गेला आहे. ‘ रूढी ’ ही साधारणतः मोकळेपणें, उजळ माथ्यानें किंवा एकटीदुकटी वावरताना तुम्हाला क्वचित् दिसेल. तुम्हां–आम्हांवर रूढीचा नसेल येवढा रूढीवर ‘ राक्षसी ’ ह्या विशेपणाचा पगडा बसलेला आहे. ‘ रूढी ’ म्हटलें म्हणजे ती ‘ राक्षसी ’ आहे हें आलेंच. ह्याच भयंकर व कंटाळवाण्या संदर्भांत आजवर आम्ही तिला घोळविलें आहे. ‘ रूढी ’च्या कच्छपीं आम्हीं अनिवार्यपणे लावून दिलेला हा ‘ राक्षसी ’ लबेदा कधीं मागून तिच्या मानगुटीवर बसतो, तर कधीं पुढून तिला झोंबत सुटतो; कधीं ती ‘ राक्षसी रूढी ’ असते तर कधीं ती ‘रूढी राक्षसी’ असते ! घटस्फोट, प्रियाराधन, स्त्रियांचें केशकर्तन, अशा कितीतरी दैवी



स्वरूपाच्या नव्या रूढी आम्हीं आतां रुळवीत आणल्या आहेत. परंतु तरीहि त्या काल्पनिक राक्षसीच्या जबड्यांतून अद्याप कांहीं आम्हांस

बिचाऱ्या रूढीची मुटका करतां आली नाहीं. रूढीचा विलगपणें विचार करणेंच आम्हास अशक्य झालें आहे. रूढीचें नांव काढतांच नखें वाढलेलीं, मुळे बाहेर आलेली व भयंकर आविर्भावानें जिभा चाटणारी ती 'राक्षसी' रूढीइतकीच आमच्याहि चटकन मानेवर बसते! 'समाजा'च्या संदर्भात 'सैतानी' पणाचा हैदोस पाहिल्याशिवाय जसें आम्हास बरें वाटत नाहीं तसेंच 'रूढी'च्या राज्यात आगेंमागें 'राक्षसी'चें लचांड लावून दिल्याशिवायदेखील आम्हास सुखाची झोप येत नाहीं. तेव्हां आता हें देखील ठरूनच गेलें आहे. 'समाज' म्हटलें म्हणजे जसा 'सैतानी समाज' किंवा 'समाज सैतान'च आम्हास दुहेरी अर्थानें पछाडतो, नुसत्याच निरपराध समाजाचा आम्ही विचारदेखील करूं शकत नाहीं, तद्वतच 'रूढी'चें नाव काढतांच तिच्या शेजारीच दबलेली अक्राळविक्राळ 'राक्षसी' देखील आमच्या कल्पनेचा वांस घेते!

दृश्याशेजारींच अदृश्यपणें पण अपरिहार्यपणें दडून बसलेल्या ह्या जोड-शद्बांच्या साम्राज्यात 'राक्षसी', 'सैतानी', 'कुचंबणा', 'दुर्दैवी', 'हतभागी', 'अरेरावी' ह्याचाच धडकी भरविणारा धुमाकूळ चालला आहे, असे समजण्याचें मात्र कारण नाहीं. 'पारतंत्र्याची' (काळरात्र, काळोखी रात्र किंवा अमावास्या), परदास्याच्या' (शृंखला, बेड्या किंवा साखळ्या), 'हुतात्म्याचें' (रक्त, रुधिर;—पण घाम मात्र मुळींच नव्हे; हुतात्मे करतात तेव्हा एकदम मोठें तडाक्बिंद काम उरकतात. घाम काढणाऱ्या किरकोळ कामाना ते घरगुती चाकराप्रमाणेंच बहुधा हात लावीत नाहींत.) 'वीरांच्या' (गर्जना, असिलता, किंवा प्रतिज्ञा. टोप्या, गळपट्टे अथवा इजारी नव्हत!) 'सतींचे' (शाप किंवा आशीर्वाद. अधल्यामधल्या बुजवी टप्प्यांची सती दखल घेत नसते!) 'दडपशाहीचा' (वरवंटा.

लाटणें किंवा स्टीम रोलर नव्हे ! ) असल्या दुधारी जोडशद्बांचा दंगा येथें मोठ्या प्रमाणावर चालत असला तरी अन्य आकर्षणेंहि उठावानें आढळतात. ' गालावरचे ' ह्या शद्बाच्या उच्चारासरशीं ' खुंट ' अथवा ' वळ ' हे पूरक शद्ब कधीं स्वप्नांतहि आपणांस दिसत नाहींत. तर भरघोस ' गुलाब 'च आपण मिटल्या डोळ्यांनीं फुललेले पाहतों. ' दातांच्या ' ह्या शब्दांसमोर आपोआपच ' कुंदकळ्या 'ची पाखरण पडते. तेथें कवड्या, कवळ्या वा बत्तासे कधींहि माडत नाहींत. ' अधरावरील ' ' अमृत 'च आपण घाईघाईनें चोखत सुटतों. तेथें पेटत्या विडीचा चटका बसण्याचाहि संभव आहे अशी निसटती शंकाहि कधीं आपणास येत नाहीं. तसेंच ' पुण्यश्लोक ' विशेषणावर सामान्यतः ' पूर्वजा 'चीच वहिवाट चालते. आपल्या पूर्वजाच्या मेळाव्यातच बाळाजीपंत नातू, सूर्याजी पिसाळ, अंबराधिप मानसिंग या महाभागाची गणना होते ही गोष्ट तेव्हा आपण सोईस्कर रीत्या विसरून जातो.

' आपली ' ह्या संदर्भात ' उज्ज्वल ' हें विशेषण आलें म्हणजे तेथें गुप्त सरस्वतीप्रमाणें ' परंपरा ' किंवा ' संस्कृति ' ह्याचे अस्तित्व आहे म्हणून खुशाल समजावे ! तो आणि ती ह्याच्या संबंधात ' ज्वाला ' हा शब्द आला म्हणजे तेथें सहस्र अंशानीं ' प्रेम ' किंवा ' विरह ' ह्याचा प्रादुर्भाव असतो. ' जातीय ' ह्या शब्दानें ' दंगा ' ' द्वेष ' ' रक्तपात ' आदि सोनुल्याना पोटाशीं धरलें असून ' जागतिक ' ह्या शब्दानें ' परिस्थिति ', ' विचारप्रवाह ', व ' राजकारण ' ह्यांना दत्तक घेतलें आहे.

' पारतंत्र्या 'चा तो ' अंधार ' किंवा ' अमावास्या ' ही गोष्ट जितकी खरी, तितकीच ' स्वातंत्र्याचा ' तो ' सूर्योदय', ' अरुणोदय ' किंवा किमानपक्ष ' शुक्रतारा ' ही गोष्टदेखील खरी. शुक्रतारा, किंवा

अरुणोदय म्हटल्यास आपणांस आकाशाचा बोध व्हावयास अडचण पडूं नये, पण जणूं काय समानार्थी व अविभाज्य असल्याप्रमाणें हे शब्द ऐकताच आपणांस एकदम स्वातंत्र्य आठवतें! आता आपणास स्वातंत्र्य मिळाल्यामुळें पारतंत्र्य व काळोखी रात्र, दास्य व शृंखला, स्वातंत्र्य व अरुणोदय हे अतोनात वापरात असलेले जिवश्चकंठश्च जोडपग बासनात ठेवण्याची वेळ आली आहे. 'देशाचें दुर्दैव', 'स्त्रियाची कुचंबणा', 'खंडाळयाचा घाट' ह्याचा उपयोग मात्र आपण, देश, स्त्रिया, दुर्दैव व खंडाळयाचा घाट हीं अस्तित्वात असेपर्यंत करण्यास प्रत्यवाय येईलसें वाटत नाहीं. तथापि जोडशब्दाचा एक संच निरुपयोगी झाला तरी हळहळ वाटण्याचें कारण नाहीं. देशाच्या शृंखला तुटल्या तर मजूरवर्गाच्या शृंखला कामीं येतील व शब्दाची नवी साखळी उत्पन्न करतील. उदाहरणार्थ, 'कामकऱ्याची' म्हटलें म्हणजे तुम्हीं काय समजाल? मस्ती? मग्रूरी? दारूबाजी? बेपर्वाई? अर्थातच नाहीं! 'कामकऱ्यांची' म्हणजे 'पिळणूक!' पहिल्या वर्गात 'पिक्चर' पाहणाऱ्या, बसमध्यें दरिद्री मध्यमवर्गीयास गचाड्या देणाऱ्या, व संपाचे कोलदांडे घालून बऱ्यांच्या नाड्या आखडणाऱ्या कामकऱ्याची पिळणूक म्हणजे त्यानीं निष्ठुरपणें इतराची केलेली पिळणूक नसून त्याची झालेली निर्दय पिळणूक होय. 'पिळणूक' हा शब्द ऐकताच 'मजूराची' हा शब्द ढोलताशाच्या नादात आपल्या कानाशीं आपोआपच बडवला जातो! भाजीवाली, बाल्या, रामा हे आपली पिळणूक करूं शकतील असें आपणास शक्यच वाटत नाहीं. पिळणूक व्हावयाची तर ती ह्या श्रमिक वर्गाचीच होणार हा अगदीं निरपवाद सिद्धांत आहे! म्हणून घोडागाडी, शेलापागोटें, चोरचिलट ह्या जोडशब्दाइतकेच घनिष्ट संबंध 'श्रमिक' व 'पिळणूक' ह्यानाहि उत्पन्न झाले आहेत! शब्दाच्या ह्या अनिवार्य जोड्यांत उत्पन्न

झालेला जिव्हाळा व एकरूपता ध्यानांत घेतां काटकसरीच्या दृष्टीनें या जोडयांपैकीं कोणताहि एक शब्द वापरल्यास मुळींच अर्थहानि न होतां लेखकाचे व वाचकांचेहि बरेच श्रम वांचतील. केवळ एक व्यायाम म्हणून प्रिय वाचकांनीं पुढील शब्द सोडलेला धडा किती विनायास वाचतां येतो तें प्रत्यक्षच पहावें.

## बौद्धिक व्यायाम–माला

### शब्द सोडलेला धडा १.

### प्रेमाचा घाट

पारतंत्र्याचा XXX ओसरला होता. देशाचें XXX समाप्त झालें होतें. राष्ट्रमातेच्या XX गळून पडल्या होत्या. स्वातंत्र्याचा XXXX झाला होता. हुतात्म्यांनीं सांडलेलें XX कारणीं लागलें होतें. अशा वेळीं खंडाळ्याच्या XXX एक तरुणी उभी होती. तिचे दांत XXXX सारखे होते. नाक XXXX सारखें होतें. त्या हिंदू स्त्रीची XXXX झाल्याचें स्पष्ट दिसत होतें. मैतानी XXX नें तिचा छळ मांडला होता. रूढी XXX ने तिला त्रस्त केलें होतें. बापाच्या पुरुषी XXXX नें तिला घराबाहेर काढलें होतें. विरहाच्या व प्रेमाच्या X X नीं दग्ध झाल्यामुळें खंडाळाहि तिला सहाऱ्यासारखा उष्ण वाटत होता. भगवान् XXXXX अस्तास जात असताच नेथें एक XXXX झालेल्या मजुराचा तरुण पुढारी धावत आला. चार डोळयांचें XXX झालें. तिच्या अंगावर XXX उठले. आणि गालावर XXX फुलले. त्यानें तिला XX मारली. तिनेंहि त्याला XXXX दिलें. हातात हात घालून तीं खंडाळ्याचा XX चढूं लागलीं. ह्या कथेचे XXX सांगावयास पाहिजे काय ?

हंस, जून ४८

# विज्ञापन - विहार

आजकालचें जग विज्ञानाचें तर आहेच, पण त्याहिपेक्षा अधिक तें विज्ञापनाचें जग आहे. आजकाल एखाद्यानें नुसतें सद्गुणी किंवा श्रीमंत असून भागत नाहीं तर त्याचें तसें विज्ञापन होणें हें अधिक आवश्यक मानलें जातें. एखाद्या बाईनें नुसतें सुंदर असणें हें आतां पुरेसें नाहीं, किंबहुना ती फारशी सुंदर नसली तरी चालेल, परंतु ती सुंदर आहे, एखाद्यानें चागला ग्रन्थ लिहिणें ही आतां प्रथम महत्त्वाची बाब नव्हे, पण त्यानें लिहिलेला ग्रन्थ अलौकिक, अमोल व असामान्य आहे अशी त्याची जाहिरात होणें मात्र फार उपयुक्त होय. खरें पुसाल तर चांगला ग्रंथ लिहिण्यापेक्षा त्या ग्रंथाची चांगली विज्ञापना लिहिणें किंवा करविणें हेंच आज श्रेष्ठतर चातुर्याचें कर्तृत्व मानलें जातें.

जाहिरातींच्या जगांत काय नाहीं ? सर्व कांहीं आहे. जगात जें कांहीं असेल तें तर विज्ञापनसृष्टींत आहेच पण जगांत जें सांपडणें दुरापास्त, तेंहि जाहिरातींच्या जगात सहजलभ्य आहे.

केसाची साफ बोडंती करणाऱ्या बादशाही साबणापासून तो केसांचीं रानें पिकविणाऱ्या कामिनिया तेलापर्यंत; नकोशा संततीचा नायनाट करणाऱ्या जालीम वडीपासून तों हव्याशा संततीस निमंत्रण

देणाऱ्या अद्भूत जडीपर्यंत, चोरापासून रक्षण करणाऱ्या लोखंडी तिजोरीपासून तो चोरास उपयोगी पडणाऱ्या चोरकंदिलापर्यंत, वाढतें वजन घटविणाऱ्या क्रुशेन साल्टपासून तों घटतें वजन वाढविणाऱ्या कॉडलिव्हर ऑईलपर्यंत, मच्छरे मारणाऱ्या पॉयशा पिचकारीपासून तों माणसें मारणाऱ्या भडिमार यंत्रापर्यंत, एका रुपयातील एकशे छपन्न वस्तूंपासून तों थेट एकशे छपन्न रुपयातील एका वस्तूपर्यंत, कोकशास्त्रांतील आसनांतल्या चित्रापासून तो तहत योगशास्त्रातील सचित्र आसनापर्यंत "हर एक चीज" जाहिरातींनीं अत्यंत माफक मूल्यात तुम्हाआम्हासाठीं उपलब्ध करून ठेवली आहे. जगाविषयीं जन्मजात चिंता हा विज्ञापकांचा



हळुवार व स्पृहणीय विशेष होय. "तुमची कातडी मृदु ठेवणें" आवश्यक कसें आहे तें त्या तुम्हांस समजावून सांगतील. तुमच्या बायका-पोरांच्या भविष्याविषयीं तुम्हांस स्वप्नांतही वाटली नसेल इतकी चिंता

त्यास लागून राहिली असल्याचें तुम्हांस आढळून येईल. तुम्हांस नोकरी-धंदा नसल्यामुळें तुम्ही जितके बेचैन असाल तितके हे विज्ञापक महात्मे बेचैन असल्याचें दिसेल. पुत्रप्राप्तीचे अनेक उपाय ज्या आपुलकीनें तें तुम्हांस सतत सुचवितील त्यावरून तुमच्या पुत्रलाभावर त्यांच्या बेचाळीस पिढ्यांचा स्वर्गवास किंवा नरकवास अवलंबून असावा, असेंच तुम्हांस वाटेल. तुम्हास " श. वा. " (शरीचा वास) चा बाधा नसावी ह्याविषयीं चिंता ते वाहतात. तुमचे केस अकालीं गळूं लागल्यामुळें तुम्हीं किंवा तुमची कारभारीण जितके सचिंत नसताल, तितके ते चिंतातूर असतात व " हें तुम्हांस होऊं देऊं नका " ( Dont let this happen to you ) अशी तळमळीची चेतावणी निष्काळजी जीवांस तें वारंवार देत असतात. येवढेंहि करून अखेर तुमच्या गफलतीमुळें तुम्हांस टक्कल पडलें, तरी तुमच्याविषयीं राग न धरतां एखाद्या अंड्याइतकें गुळगुळीत झालेलें तुमचें डोकें पुन्हां केसाळ कसें होईल, ह्याविषयीं मोठ्या आस्थेवाइकपणें प्रेमळ सल्ला द्यावयास ते पुन्हां सिद्धच असतात. तुमचे दांत मजबूत राहणें किती आवश्यक आहे, तुमचें पोट सुटणें ही किती वाईट गोष्ट आहे, केवळ बाहेरच्या स्वच्छतेपेक्षाही आंतरिक शुद्धता (Inner Cleanliness) किती महत्त्वाची गोष्ट आहे, स्त्रियांची आकृति व विशेषतः त्यांच्या उरोजांचा आकार ह्यांस स्त्रियांनीं किती जपलें पाहिजे ह्यांपासून तों विजेचा दिवा बरोबर घेतल्याविना अंधेरात जाण्याचे किती घोर दुष्परिणाम होतात, थंडी, खोकला ह्यांची उपेक्षा केल्यानें कोणते अनर्थ उद्‌भवतात, तुमच्या तोंडात हिरड्या नांवाची वस्तू आहे ह्याचेंहि तुम्हांस भान नसलें तरी त्यांचें वास्तविक महत्त्व काय आहे, पावसाळ्यांत कोणती बरसाती वापरणें श्रेयस्कर, तुमच्या मच्छरदाणीला न जुमानणाऱ्या मच्छरांचा निःपात करण्यासाठीं काय केलें पाहिजे, इत्यादि अनंत विषयांची

तपशीलवार चिंता ते तुमच्यासाठीं वहात असतात. बरें, तुमच्या सुटलेल्या पोटाकडे अंगुलीनिर्देश करतांना, किंवा तुमच्या किडक्या दांतांचा रहस्यभेद घेतांना विज्ञापकांची वृत्ति केवळ विध्वंसक, टीकेची, अथवा दुष्ट टवाळीची असते असें नाहीं. काय आहे हें सांगत असतांच काय असलें पाहिजे, व तें कसें प्रत्यक्षांत आणतां येईल, ह्याविषयीं विधायक सूचना करावयास ते कधींहि चुकत नाहींत. नव्हे, तुम्हांपुढें कांहीं विधायक कार्यक्रम ठेवण्याच्या दृष्टीनेंच केवळ ते टीकेस प्रवृत्त होतात. तुमची आकृति फार बिघडलेली आहे, व तुमचे ढेरपोट प्रियाराधनाच्या बाबतींत अडचण उत्पन्न करीत आहे हें कटुसत्य निरुपायानें तुमच्या निदर्शनास आणल्यावर लागलींच "पोट-सपाट" पट्ट्यासारखा ह्या दोषास दुसरा उत्तम उपाय नाहीं, हें देखील ते तुम्हांस ठासून सांगतील, "सपाट आकृतिसारखा रमणीजातीस भयंकर शाप नव्हे हें पाणउतारा करणारें सत्य निर्भीडपणें सांगून टाकल्यावर लागलीच स्त्रीवर्गाचा खचलेला धीर व वाढलेला संताप ह्यांस घालवणारी किमया म्हणून ते तत्काळ "माउंट एव्हरेस्ट" कांचोळीचा रामबाण उपयोग सुचवितील. तुमचे दात किडके आहेत किंवा तुमचा मेंदु कमजोर आहे असें मर्मभेदक व बदनामीकारक विधान करून थांबणें हें विज्ञापकाचें ब्रीदच नव्हे. लगेच तुमच्या पाठीवर हात फिरवून तो तुम्हांस सांगेल कीं, तुमचे दात कितीहि गलिच्छ व तुमचा मेंदु कितीहि पोकळ असला, तरी तो "भग्नदंत" 'ब्रेनॉलच्या' आटोक्यापलीकडे निश्चित नाहीं.

* * *

अंधेरांत जाणें भयपरिणामी खरें; पण तें कोणाला ? तर ज्याला अमुकतमुक विजेरींचा उपयोग माहित नाहीं त्या मूर्खाला ! थंडी खोकल्याचे परिणाम अनर्थकारक खरे, पण ते "गोबी" गोळ्याच्या एकनिष्ठ भक्तासाठीं निश्चितच नव्हेत ! डास व ढेकूण माणसास त्राहि

भगवान करतात ह्यांत शंका कशाची ? पण "भस्मासूर" भुकटीच्या चतुर उपासकास त्या तुच्छ कीटकांपासून कशाचें भय ?

ह्याच क्रमानें कोणत्याहि आपत्तीचा अथवा पीडेचा निर्देश केल्यावर तिच्या निराकरणाचें रहस्य निरुपण करणें हें विज्ञापकांचें पवित्र उपकारक व्रत आहे.

कोणत्याही विषयात विज्ञापक एकांतिक किंवा हट्टाग्रही असतो असे मुळींच नाहीं. कोणाहि दुःखी दंपतीस अपत्यदान करावयास तो कटिबद्ध असला तरी तो झाडाचा प्रतिगामी खचित नव्हे. संततिदानाचीं साधनें पुरविण्याच्या विषयात त्याचा उत्साह जितका दांडगा तितकाच संतीत नियमनाचीं साधनें पुरविण्याच्या विषयांतील त्याची ईर्षा प्रचंड ! तुमचे दांत पाडावयास ज्या आतुरतेनें तो तुम्हांस आपले महकार्य देईल, त्याच तत्परतेनें तुमच्या मुखगव्हरातील कृत्रिम बत्तीशिच्या प्रतिस्थापनेबाबतहि तो तुमच्या सेवेस सादर होईल. तुमच्या एकाहि केसास धक्का न लागूं देण्याविषयीची त्याची हमी जितकी जिव्हाळ्याची, तितकीच तुमच्या शरिरावर वाल म्हणून शिल्लक न राहू देण्याविषयीं त्याची जिद्द धडाडीची ! कधीं तरुण, सधन व सुशिक्षित वर लग्नास तयार असल्याविषयींची शुभ वार्ता योग्य उपचारानें तो तुम्हास सांगेल, तर कधीं "खालीं सही करणार धुरपती जवजे धर्मा नोटिस देते कीं" अशी चंडखोर गर्जना तो तुम्हास ऐकवील. विज्ञापकाची ही सृष्टीच मोठी स्थितप्रज्ञ व समदर्शी आहे. गजगामिच्या चेहेऱ्यास सौंदर्य देणारी क्रीम व गजकर्णास आराम देणारे मलम, त्रिकालदर्शी आरसा व शून्य क्रमांकाची आरशी, काश्मिरी केशर व उवा मारण्याचें औषध ह्यांची तेथें एकाच दमांत वासलात लावली जाते. साऱ्या जगाचीं दुःखें दूर करावयास निघालेल्या प्रेषिताप्रमाणें विज्ञापकांची वाणी मोठी स्फूर्तिप्रद असते. रडकुंडी

आलेल्या जगास आशेचा संदेश सांगत विज्ञापने गर्जून विचारतात कीं, 'निराश कां होता ? परीक्षेंत यश, उत्तम चाकरी, रोगापासून मुक्तता, मनपसंत बायको, कोर्टकचेऱ्यांत फत्ते, मत्सर करणाऱ्या हितशत्रूंची दाणादाण, वरिष्ठांची कृपा, इष्कांत रंग, संततीचा लाभ, त्यांना परदेशचा प्रवास, सट्टा किंवा घोडा ह्यात जीत हेंच तुम्हांस पाहिजे ना ! तर मग निराश का होता ! आजच आमचा 'धेनुवल्लभ' ताईत मागवा ! संकटें अशीं पळतील कीं जणूं वाघासमोर बकरी ! शत्रू असे नमतील की जणूं पालीपुढें विंचू ! एकदांच अनुभव घ्या ! मूल्य केवळ दहा रुपये ! ' विशेष मंतरलेल्या ताईतासाठीं रुपये पंधरा ! तीन ताईत मागविणाऱ्यास एक ताईत इनाम !''

आतां बोला ! ह्यापेक्षां Sporting Offer दुसरी कोणती असूं शकेल ! शत्रूंची भंबेरी, मनपसंत बायको, उत्तम चाकरी, सट्टयांतील यश, इष्कांतला रंग इत्यादि अनेकविध गोष्टी केवळ दहा रुपयांच्या बदल्यांत कोणासहि बहाल करावयास निघालेल्या महाभागाच्या औदार्यास कोठें तोड सांपडेल ! मात्र वरील विज्ञापनांतील अभिवचनांची चिकित्सा करूं लागल्यास बरेच पेंचप्रसंग उद्भवतात. समजा कीं, कृष्णी नांवाच्या मुलीवर कृष्णा आणि किसन ह्या दोन तरुणांचें प्रेम बसलें. दोघेहि तिच्यासाठीं छाती पिटतात. दोघेहि तिच्यासाठीं सुस्कारे सोडतात. दोघेहि तिला मनपसंत बायको समजतात. दोघेहि तिचा लाभ आपल्याला व्हावा म्हणून पंधरा रुपयांचा विशेष गुणकारी " धेनुवल्लभ स्पेशल ताईत " विकत घेतात. कृष्णाची कल्पना असते कीं प्रतिस्पर्ध्याची दाणादाण उडवून देणारा आपला ताईत किसनचा फज्जा उडवून देणार ! किसनलाहि कृष्णाविषयीं थेट तसेंच वाटत असतें. आतां ह्या झगड्याचे पर्याय किती चमत्कारिक निघतात पहा.

ताईतांच्या प्रभावानें कृष्णा व किसन हे दोन्ही प्रतिस्पर्धी एका दमात ठार व्हावयास पाहिजेत. कारण शत्रूचा नाश व्हावा म्हणूनच ते दोघेहि ताईत बाळगीत आहेत. कृष्णा व किसन दोघेहि आटोपले म्हणजे मग त्यांना मनपसंत बायको देण्याचें आश्वासनहि निकालांत निघतें त्याचें काय ! बरें ते निकालांत निघालें नाहींत तर शत्रूचा नायनाट करण्याचें त्यांस मिळालेलें वचन खोटें पडतें. आणि शत्रूचा नायनाट व्हावा अशी तर त्या दोघांचीहि इच्छा असते. ते दोघेहि जगले पण त्यापैकीं कोणाचेंच कृष्णीशीं लग्न न लागता "धेनुवल्लभ" ताईताशीं चुकूनहि संपर्क न ठेवणाऱ्या एखाद्या पाखंड्याची ती घरधनीण झाली तरी पुन्हां सारेंच मुसळ केरांत !

आणखी वर आपण अशी कल्पना केली कीं कृष्णी ही कृष्णा व किसन ह्या दोघांसहि पापग्रह मानत असून त्यांचें निवारणार्थ तिनेंहि "धेनुवल्लभ" ताईतच ( स्पेशल क्वालिटी ) बांधला होता म्हणजे आली पंचाईत ? ह्यांतहि असें मानलें कीं, कृष्णापासून स्वतःस संरक्षण मिळावें म्हणून कृष्णीच्या स्वप्नपुरुष असणाऱ्या करसननें देखील "धेनुवल्लभ" ताईताचीच कास धरली होती म्हणजे संपलेंच सारें ! आतां कितीहि जाज्वल्य ताईत झाला तरी हा गुंता सरळपणें सुटणार कसा ? विज्ञापनांतील प्रकट प्रतिज्ञेप्रमाणें कृष्णा व किसन ह्या दोघाचेंहि लग्न कृष्णीशींच लावण्याचें, तसेंच कृष्णीचें लग्न करसनशीं लावण्याचें, त्याचप्रमाणें करसनचें लग्न कृष्णीशीं न लागू देण्याचें, तद्वतच कृष्णा व किसनपासून कृष्णीचें रक्षण करण्याचें त्याचप्रमाणें कृष्णासाठीं किसनची व किसनसाठीं कृष्णाची दाणादाण उडविण्याचें, आणि त्या दोघांचाहि कृष्णीच्या संतोषार्थ निःपात करण्याचें, आणि कृष्णीला नामोहरम करून करसनला अभय देण्यासाठीं कृष्णीचा विवाह कृष्णाशीं वा किसनशीं लावण्याचें, अथवा

"धेनुवल्लभ"ची बाणी राखण्यासाठीं करसनच्या संतोषार्थ अन्यप्रकारें तिचा काटा काढण्याचें विकट उत्तरदायित्व एकस्या 'धेनुवल्लभ' ताईत (स्पेशल क्वालिटी) वर कोसळतें ! आणि पंधरा रुपयांच्या मोलांत त्या सर्वांचीच सर्व प्रकारची कामगिरी चोखपणें बजावण्यास त्या ताईताचा सत्यप्रतिज्ञ व सर्वसमर्थ कर्ता शब्दाला गुंतला होता तेव्हां आतां हें व्हावें कसें ?

* * *

त्याच प्रकारचे अफलातून हिशेब परीक्षेच्या पहिल्या क्रमांकासाठीं "धेनुवल्लभ" ताईताच्या बळावर जीव पाखडणारे शेकडों विद्यार्थी, त्याहि खात्यांतील एकाच चाकरीसाठीं धडपडणारे अनंत अर्जदार, ह्यांच्या विषयांतहि सहज मांडून दाखविता येतील.

आशेचा स्फूर्तिप्रद संदेश हें विज्ञापकाच्या बहुरंगी भाषेंतील एक सूत्र झालें. परंतु "निराश का होता ?" ह्या अलंकारिक प्रश्नानें त्याचा वाग्विलास संपत नाहीं. घाबरलेल्या जीवास ते पुष्कळदां "होऊं नये गोष्ट झाली" असा सहानुभूतिपूर्ण दिलासा देऊन नंतर "पण आता उपाय केला पाहिजे" अशी करडया क्रियाशीलतेची प्रेरक वाणी ऐकवितील, व मग पुन्हां त्यास विश्वासांत घेऊन मृदुपट्टींत कुजबुजतील कीं "गुपचुप" "पत्रव्यवहार गुपचुप ठेवला जाईल !"

कधीं मरगळलेल्या जीवाचें मरतें कुतुहल जागविण्यासाठीं ठळकपणें "चित्तचकोरा !" येवढाच शब्द उद्गारून खिजविणाऱ्या भिस्किलपणें ते त्यास खालच्या स्वरात पुसतील कीं "चित्तचकोरा हिरमुसून कां बरें गेली ? तिनें रुष्ट होऊन जावें असें तुजकडून काय घडलें ! हा काव्यमय वाग्बाण मर्मावर लागतांच आधींच मरगळलेला तरुण अर्थातच रक्तबंबाळ

होतो व त्यास आपंगावयास उत्सुक असलेल्या विज्ञापकांस तो सपशेल शरण जातो.

कांहीं धूर्त विज्ञापनें एखाद्या कुशल शिकाऱ्याप्रमाणें भलती हूल देऊन आपलें सावज अचूक जाळ्यांत गुंतवितात. ठराविक ठशाचीं व ठराविक भाषेचीं विज्ञापनें तुच्छ त्रयस्थतेनें ओलांडून जावयाची संवय जडलेल्या गर्विष्ठ लोकांस विज्ञापकांकडून मिळणारा हा उतार होय. उदाहरणार्थ हिंगजिऱ्याविषयीं विज्ञापकांस बोलावयाचें असल्यास ते "कामरूपची राणी" ह्या चाळविणाऱ्या मथळ्यापासून प्रारंभ करून अखेर तुम्हांस हें सांगतील कीं येवढी कामरूपची काव्यमय राणी पण ती देखील आमचा "बोकड छाप" हिंगच आपल्या स्वयंपाकासाठीं पसंत करते. एखाद्या नटीच्या आरसपानी अंगकांतीच्या अथवा उत्फुल्ल मुखकमलाच्या रसभरित वर्णनापासून प्रारंभ करून तो कथाभाग अखेर एखाद्या साबणापर्यंत नेऊन भिडविण्याचा प्रकारहि ह्या विशिष्ट चातुर्याचाच निदर्शक होय. तुम्हांस स्वर्गांत सोडण्याची हूल दाखवून अखेर पाताळांत पोहोंचविण्यांत विज्ञापनें कशीं यशस्वी होतात त्याचा हा मासला पहा—

* * *

# धर्मशाळा

आपल्या ह्या भारतवर्षांत गोशाळा, अग्निशाळा व मद्यशाळा आहेतच, पण धर्मशाळेचें स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रांतभेदपरत्वें कुठें "छत्रम्" म्हणतात तर कुठें "चोल्ट्री" म्हणतात तर कुठें "सराई" म्हणतात तर कुठें धर्मशाळाच म्हणतात. आपल्या देशांत धर्मशाळांची एकुण संख्या दहा सहस्र नउशें पंचावनच्या आसपास असावी.

तुम्हीं कधीं धर्मशाळेंत उतरलांत तर तेथील चाकरवर्गापासून जपून असा व खोल्यांस स्वतःचीं कुलुपें लावा. दक्षिण भारतापेक्षां उत्तर भारतांतील धर्मशाळांचा थाट कांहीं वेगळाच असतो. परंतु हें खरें असलें तरी आपणावर धर्मशाळेंत जाण्याचा प्रसंग यावा असें कोणास वाटेल ? अखेर सत्तेचें घर हाच इहलोकीचा स्वर्ग म्हणून आपलें घर बांधतांना " धी पॅरेडाईज हाऊसिंग सोसायटीचें " नाव नेहमीं ध्यानात ठेवा ! "

## जुईची कळी

राणी पद्मिनी ही जुईच्या कळीस लाजवील इतकी सुंदर होती ! परंतु ती केवळ सुंदर नव्हती तर शूरहि होती. रूपमती, कृष्णाकुमारी, दुर्गावती ह्या साऱ्याच रजपूतरमणी जितक्या सुंदर तितक्याच शूर होत्या. कृष्णानें विषाचा प्याला हंसत घेतला. राणी पद्मिनीनें जळत्या अग्नींत उडी घेऊन जोहार केला. आता काळ पालटला आहे. जोहार करण्याचें धैर्य दाखविण्याचा प्रसंग आता तुमच्यावर येणार नाहीं. पण रमणींनो ! पुनर्विवाहास लागणारें धैर्य दाखविण्याचा प्रसंग मात्र तुमच्यावर केव्हाहि ओढवूं शकेल. तसा प्रसंग आलाच तर आमची संस्था तुमच्या सेवेस सादर राहील. **दिगंबर अवदुंबर शेट्ये** ह्यांची '**सबकुछ** लग्नसंस्था ' ही सर्वांच्याच कौतुकास पात्र होणारी एकमेव विश्वासार्ह संस्था आहे. तारेचा पत्ता : जुईची कळी. इन्डिया.

* * *

" अशक्य " हा शब्द एक नेपोलियन बोनापार्टच्या कोषांत आढळला असता, परंतु " अशक्य " किंवा "अगम्य" ह्यापैकीं कोणताच शब्द आजचे विज्ञापनशास्त्री ओळखत नाहींत. " श्रीमंतीचा राजमार्ग " तर ते जाणतात. ( विज्ञापनाविद्येच्या बळावर श्रीमंत होऊन ते ह्याचें

नाकारता येण्याजोगें प्रत्यंतरच देतात ) साठी उलटलेल्या एखाद्या जरत्कारू खोकडास नवतारुण्य, विशींतल्या नवतरुणास अतितारुण्य व तिशींतल्या अतितरुणास महातारुण्य बहाल करणें हा तर ते नुसता हातचा मळ समजतात. वशीकरणयंत्राच्या बळावर एखाद्या सुरेख राजकन्येस कोणत्याहि भुक्कड कलंदराच्या मागोमाग फिरविणें ही ते नेहमीं पोरचेष्टा मानतात. परीक्षेंतील यशाचा अथवा धंद्यातील उत्कर्षाचा संबंध तुमच्या कर्तृत्वाशीं आहे, असें मानण्याऐवजीं तो स्वतःच्या कर्तृत्वाशीं अथवा एखाद्या आंगठीशीं आहे, अशी त्यांची निरागस कल्पना असते. शर्यतीतले घोडे, आकाशांतले तारे, व मातृत्वाचें पाळणे त्यांच्याच आज्ञेनें हालतात, असा त्यांचा होरा वाहतो. आंधळ्यास दृष्टि देणें, बहिऱ्यास श्रवणशक्ति देणें, व पांगळ्यास चारशे यार्डांच्या शर्यतींत धावतें करणें ह्या त्यांच्या दैनंदिन क्रीडा होत. ज्या रोगावर विज्ञापनविशारदांनीं रामबाण औषध सांगितलें नाहीं असा कोणता रोगच अद्याप उत्पन्न झाला नाहीं. त्याच्या त्रिकालदर्शी आरशांत ज्यांचें प्रतिबिंब पडत नाहीं, असें अखिल विश्वांत कांहीं घडतच नाहीं. विज्ञापनविशारदांचा स्वतःच्या कर्तुमकर्तुम् अन्यथा कर्तुम् शक्तीवरील विश्वास हा असा आहे. परंतु ह्यापेक्षा कमी प्रतीचा आत्मप्रत्यय असणारे विज्ञापनशास्त्री अधिक चलाखीचे पवित्रे टाकतात. ह्या कलियुगात शंका नांवाची त्रासदायक वस्तु पैदा झाली आहे असा त्यांना दाट संशय असतो. म्हणून एखाद्या दिव्य औषधींची तडाखेबंद जाहिरात करतांना सावधपणानें प्रथमच ते सांगून टाकतात. “ हिमालयस्थ गुरुमहाराजाच्या कृपेनें ह्या औषधींचें ज्ञान आम्हांस प्राप्त झालें असून भूपृष्ठावर तिचा प्रसार करण्याची आम्हांस आज्ञा झाली आहे. तिबेट, हिमालय, कामरूप येथील दुर्मिळ वनस्पती ह्या औषधींत मिसळलेल्या असून प्रत्यक्ष गुरुजींनीं त्यांवर मंत्र माराला आहे. लोकांस केवळ माहित व्हावें म्हणूनच ही जाहिरात देण्याच्या फंदांत

आम्हांस पडावें लागलें. कोणी कितीहि आग्रह केला तरी औषधींचें मूल्य आम्ही मुळींच घेणार नाहीं. ( कारण गुरुमहाराजांची आज्ञा नाहीं. ) पंचवीस रुपयांची व्ही. पी. केवळ ॲडव्हरटाईजचा खर्च निघावा म्हणून करूं."

. ह्या जातीच्या जाहिरातींचे अनेक पाठभेद संभवतात; त्यापैकीं कांहीं कुशाग्र बुद्धीचे महामुनी आपल्या औषधांतील घटकांची लांबलचक यादी शंकेखोरांच्या समाधानासाठीं देऊन त्यांत हारणखुरी, शुद्ध शिलाजित, सालम मिश्री, सफेद मिश्री, गोखरु, गुलाबकळी, वगैरे वस्तु असल्याचें प्रांजळपणें सांगतात व मग चारदोन चिजांचीं अशीं कांहीं नांवें झोकून देतात कीं, त्यांच्या अस्तित्वाचा कुणासच (गुरुमहाराजाविना) पत्ता नसावा. नाहींपक्षीं अवलिया साहेबांच्या मंत्राचा पेच आहेच !

आपल्या उद्देशांच्या व औषधींच्या शुद्धतेविषयीं शक्य तेवढा पुरावा सादर करणाऱ्या ह्या योगीराजाचा हिमालय, तिबेट, कामरूप वगैरे दूरस्थ व दुर्गम प्रदेशावर विशेष कटाक्ष, असतो. परोपकाराच्या हेतूनें मैदानात उतरून केवळ "ॲडव्हरटाईज" पुरता खर्च घेण्याचें कार्य शिष्यशाखेचे असतें; खासे गुरुमहाराज हिमालयातील एखाद्या शिखरावर किंवा कामरूपांतील एखाद्या दरींत बसून शिष्यांची करामत अंतरदृष्टीनें नुसती पहात राहतात.

मनमिळाऊ स्पष्टीकरणासमवेतच गर्भित दटावणीचे प्रयोगहि हे दिव्य औषधींचे अथवा यंत्रांचे विक्रेते करीत असतात. ते तुम्हांला मध्येंच गुरकावून सांगतील.

केवळ पंधरा दिवसांपुरतीच ही औषधी तमाम जनतेस गुरुमहाराजांच्या आदेशानुसार उपलब्ध केली जात आहे. पंधरा दिवसांची मुदत

संपल्यावर कोणी कितीहि गयावया केली तरी ही औषधी मिळणार नाहीं. आणि कदाचित् दिलीच तर देऊंहि, पण मग दसपट दाम घेऊं !"

यंत्र, ताईत किंवा औषधीच्या परिणामकारकतेविषयीं काय कसें करीत राहणाऱ्या संशयात्म्यांचा खालील सूचनेनें पुरताच बंदोबस्त होतो—

**महत्त्वाची सूचना**:—जाहीरपणें सूचना करण्यांत येत आहे कीं आमच्या गंड्यावर ज्याची पूर्ण श्रद्धा असेल त्यासच त्याचा अजब प्रभाव पटेल. म्हटलेंच आहे कीं, 'विश्वासो फलदायकः' ज्यांचा विश्वास नसेल त्यानीं गंडा घेऊं नये. त्यांना गुण येणार नाहीं. अविश्वासू माणसांच्या अपवित्र स्पर्शानें ह्या दिव्य यंत्रांतील गुण नाहींसा होतो !"

—गंडा गुणकारी असल्याविषयीं फुकट अजिंक्यपत्र देणें, किंवा आपण अपवित्र असल्याविषयीं चुंबत मान्यता भरणें, ह्याविना संशयात्म्यास दुसरा पर्यायच मोकळा रहात नाहीं ! एका अर्थानें तरी गंड्याच्या प्रभावापुढें मान झुकविणें शंकेखोरास येथें भागच पडतें. श्रद्धाळूंना वेगळ्याच परीनें "गंडा घातला" जातो !

गर्भित किंवा प्रकट धमकीप्रमाणें वेळप्रसंगीं उघड उघड लालूच दाखवावयासहि विज्ञापक चुकत नाहीं. "तीन ताईत घेणाऱ्यास चवथा ताईत बक्षीस !" किंवा "आमचे कामशास्त्रप्रवेश हें पुस्तक विकत घेणाऱ्यास एक पेपरकटर व एक डझन "एफ्. एल्स" मोफत मिळतील !" अथवा आमच्या त्रिकालदर्शी आरशाच्या गिऱ्हाइकास स्नो, पावडर व सेफ्टी वस्तऱ्याचा एक संपूर्ण सट (तुरटीच्या चौकोनी वडीसकट) इनाम दिला जाईल" ही भाषा मनुष्याच्या स्वभावांतील "लोभ" नांवाच्या ढोबळ विशेषास गुदगुल्या करूं पाहणारी आहे. हेतु असा कीं, निदान "फुकट" मिळणाऱ्या दुसऱ्या वस्तूच्या निमित्तानें तरी पहिली वस्तू उचलली जावी "एफ्.

एल्स. " साठीं तरी " कामशास्त्रप्रवेशाचा " व " सेफ्टीरेझर " साठीं तरी 'त्रिकालदर्शी आरशाचा' मोह पडावा ! " त्रिकालदर्शी " आरशास दुसरें कांहीं दिसलें नाहीं तरी किमानपक्ष स्वतःचा चेहरा दिसेल, व गेला बाजार स्मश्रूविधीसाठीं तरी त्याचा उपयोग होईल अशी गूढ सूचनाहि आरशाबरोबरच वस्तरा ( तुरटीच्या बडीसकट ) येण्याच्या चतुर कल्पनेंत आहे

कांहीं विज्ञापक स्वतःच्या प्रामाणिकपणाची थाळी पिटत असतां आपल्या धंदेबंधूंच्या अंगावर शिंतोडा टाकावयास मागेंपुढें पहात नाहींत. ह्यावरून विज्ञापनाच्या पवित्र क्षेत्रांतहि गळेकापू स्पर्धा कोणत्या थराला गेली आहे तें स्पष्ट होईल " नकली मालापासून सावध असा ! आमच्या मालाचें प्रचंड यश पाहून तोंडास पाणी सुटलेल्या कांहीं चोरांनीं ( आम्ही त्यांचे नांव घेणार नाहीं—त्यानीं आमच्या कल्पनेची चोरी केली आहे तरी— ) आमची नक्कल सुरू केली आहे. तरी अशा भ्रष्ट नकली मालापासून आमच्या गिऱ्हाइकांनीं सावध असावें. अखेर अस्सल तें अस्सल व नक्कल ती नक्कल ! अस्सलाची बरोबरी नक्कल कशीं करणार ? कवीनें म्हटलेंच आहे की, " नामैक्यें समता चुन्यास अमृता, येईल कैशी तरी ?" तरी माल घेतांना आमचें सील, स्वाक्षरी व गिधाड छाप नीट तपासून पहा ! "

* * *

कांहीं विज्ञापनांचा प्रचार होकारार्थी असण्याऐवजीं नकारार्थी असतो. उदाहरणार्थ " कामयोग चित्रावली " चा विज्ञापक तुम्हाला सांगेल—

" अतिशय प्रयत्न करून व मथुरा, वृंदावन, हस्तिनापूर, द्वारका, गोकुळ असा लांबच्यालांब ठिकाणीं प्रवास करून सोळासहस्र राण्याशीं

शृंगार करणारा जो भगवान श्रीकृष्ण त्यानें आचरिलेल्या कामयोगाचीं तत्त्वें आम्हीं महत् प्रायासानें हस्तगत केलीं असून त्यावरच प्रस्तुत चौसष्ट आसनांची चित्रावली आधारली आहे. सवलतीचें मूल्य केवळ बारा रुपये ( टपाल हशील माफ )

**विशेष सूचनाः**—सोळा वर्षांखालील मुलास ही चित्रावली विकली जाणार नाहीं. तसेंच अशक्त प्रकृतीच्या माणसांनीं अथवा दरिद्री माणसांनीं हीं चित्रावली मुळींच घेऊं नये अशी आमची आग्रहाची सूचना आहे.

ह्या विज्ञापनाच्या नांगींतील "विशेष सूचने" चा दंश जबरदस्त असतो व सोळा वर्षांचे जिज्ञासू युवक तसेंच पंधरा रुपयाचा भार ज्यास असह्य वाटेल असे अशक्त दरिद्री ( किंवा दरिद्री अशक्त ) ह्या चित्रावलीवर नुसते तुटून पडतात हें काय सांगावयास पाहिजे ?

जाहिरातींच्या जल्लोषावरच ज्यांचें जीवन अवलंबून आहे असे बोलपट प्रदर्शकहि "सोळावर्षांखालील मुलांस ह्या बोलपटाचीं तिकिटें विकलीं जाणार नाहींत. वयाविषयीं आपल्या शिक्षकाची सर्टिफिकिटें आणा !" अशी नंबी कधीमधीं भरावयास कचरत नाहींत. ह्याचा परिणाम अर्थातच सोळा वर्षांखालील बिचाऱ्यांनीं "थेटराचा" बहुतेक भाग भरण्यांत होतो.

थोरामोठयांशीं सलगी करून त्यांनाही विज्ञापनाच्या वेठीस जुंपण्याचें जाहिरातदाराचें धाडस आश्चर्यजनक असतें. "कामयोग चित्रावली" चा कर्ता "कर्मयोगी कृष्णाला" कामयोगी बनवून आपल्या चौसष्ट आसनांना त्याचा टेकू खुशाल देतो. उलटपक्षीं श्रीकृष्ण विरचित "कामयोगाचीं" हीं गूढ तत्त्वें सहस्त्रावधी वर्षांच्या धुळींतून धुंडून काढतांना आपणांस फार कष्ट पडले असेंहि तो कपाळाचा घाम निपटत तुम्हांस सांगतो.

" याकुती " " मोदक " " तिला " वगैरे मंडळींची भिस्त बहुधा शेंकडो बायकांचा जनानखाना संभाळणाऱ्या . एखाद्या मोंगल बादशहावर असते. " आज एक बायको नांदवितांनाहि तुम्हांस धाप लागते." विज्ञापक नाक उडवून एकाच बायकोपायीं जेर झालेल्या तुम्हां सामान्य जीवांस विचारतो "तर मग तेव्हांचे मोंगल सम्राट शेंकडो बायकांनीं भरलेल्या जनानखान्याचा गोवर्धन सहज लीलेनें कसा तोलत असतील ?'– आणि मग तोच ह्या प्रश्नाचें सहास्य मुखानें उत्तर देतो: —

" ह्याचें श्रेय त्या कालच्या युनानी हकिमास दिलें पाहिजे. अकबरी मोदकात तींच दिव्य औषधें वापरलीं आहेत कीं ज्यांच्या बळावर सम्राट अकबराचा अवाढव्य स्त्रीसंसार सुखाचा झाला ! " (मोदकांच्या बळावर अकबराचा स्त्रीसंसार सुखाचा झाल्या विषयींची ग्वाही विज्ञापक भरतो. पण मोदकपुरुष अकबरासमवेत त्या स्त्रियांचा संसार सुखाचा झाला किंवा कसें ह्याविषयीं मात्र विज्ञापक मौन धरतो. स्त्रियांच्या सुखदुःखाविषयीं कोण ही उदासीनता)



ह्याच न्यायानें एखाद्या मसालेदार सुपारीचें विज्ञापन करतांना लो. टिळकांची, दम्यावरील औषधीची जाहिरांत देतांना आगरकरांची अथवा बिडी बंडलांची तारीफ सांगतांना गडकऱ्यांचा उद्धार व्हावयास उशीर लागत नाहीं.

नम्रता व आत्मस्तुतीचा अभाव हा पूर्वीं स्पृहणीय गुण मानला जात असे. परंतु रामाच्या धनुष्यबाणाइतका, हरिश्चंद्राच्या मुकुटाइतका किंवा शिवाजी राजांच्या जिरेटोपा इतकाच हा सद्गुणहि आतां इतिहासजमा झाला आहे.

ओरडणाऱ्याचे जोंधळेहि खपावें, नम्रपणें कुजबुजणाऱ्याचे मोतीहि खपूं नयेत असा आजचा युगधर्म आहे. बरें, ओरडण्याच्या शक्तीमुळें त्या ओरडणाऱ्याचे जोंधळे खपले असते तरी त्यांत फार आक्षेपार्ह कांहीं नव्हतें. पण ओरडणाऱ्याचे जोंधळे, मोती म्हणून खपतात व नम्रता धारण करणाऱ्याचे मोती मातीमोलानेंहि जात नाहींत असा विपरित अनुभव येतो. ह्या भयप्रद अनुभवापोटीं किंकाळणाऱ्या विज्ञापन युगाचा जन्म झाला आहे कीं, विज्ञापन युगापोटीं ह्या भयप्रद अनुभवाचा उगम आहे, त्याचा निर्णय सूज्ञांनीं लावावा. परंतु नम्रता व आत्मस्तुतीचा अभाव हीं विज्ञापनशास्त्राचीं आधारभूत तत्त्वें नव्हत हें निश्चित. उलटपक्षीं नम्रतेच्या अभावावर व उघड्यावाघड्या ओरडणाऱ्या, आत्मस्तुतीवरच विज्ञापनीविद्येचा भारीभार आहे.

आमचे आर्यपूर्वज ज्या अर्थी नम्रता, मितभाषण, इत्यादि बहुमूल्य गुण मानीत, त्या अर्थी त्यांची विज्ञापन विद्येंत फारशी गति नसावी असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. भाट, चारण, कवि, आदि शब्दशूर मंडळींकडून प्रसिद्धीपाटवाचा कांहींसा अनुभव आला. पण तो त्रुटीत व मुख्य म्हणजे प्रस्फूर्त आणि प्रामाणिक होता. राम, कृष्ण, अर्जुन वगैरे मंडळींचीं नांवें जीं आज उपलब्ध आहेत त्याचें श्रेय ह्या महापुरुषांचें गुणगान करणाऱ्या कवींकडेच जातें. एरवीं ते महापुरुष होते किंवा कसें, किंवा अधिक अचूकपणें बोलावयाचें म्हणजे कधींकाळीं ते अजिबात होते किंवा नाहीं; ह्याचाच पत्ता लागला नसता. एखाद्या दिग्दर्शकाची अथवा नटीची करावी तशीच प्रसिद्धि व्यास, वाल्मिकींनीं रावण, त्राटिका, दुर्योधन हिडिंबा इत्यादिकांची करून ठेविली आहे. परंतु इंचाच्या हिशोबानें अथवा प्रमाणशीर अडतीच्या ठेक्यानें त्यांची बिलें चुकती होण्याविषयीं त्यांनीं कोणाशीं बोली केली असेल असें

म्हणण्याइतका सबळ पुरावा आज तरी उपलब्ध नाहीं. आणि तसा पुरावा जोंपर्यंत उपलब्ध होत नाहीं. तोंपर्यंत आमचे पुण्यश्लोक पूर्वज विज्ञापन-विद्येची प्रथमाक्षरेंहि जाणत नव्हते, असेंच म्हणणें प्राप्त आहे.

आज मात्र ह्या पाश्चिमात्य प्रासादिक विद्येंत आम्ही जी तडाखेबंद प्रगति केली आहे तिजवरून पाहता संधि मिळाली तर आम्हीं भारतीय कोणत्याच क्षेत्रात कोणाला हार जाणाऱ्यापैकी नव्हत. असें स्पष्ट दिसतें. किडणारे दात, गळणारे केंस सुटणारें पोट, हलणारे पाळणे, चावणारे ढेकूण, न चावणारे जोडे, अंतर्गत शुद्धता, रडावणारीं मुलें, फुगणाऱ्या बायका, त्या बायकामुलांचें भविष्य, आमचें भविष्य, होऊ नयेत पण झालेल्या गोष्टी, त्यावरील उपाय, आदि आमच्या जविनाचीं तमाम अंगें प्रत्यंगें विज्ञापणविद्येनें आतां आटोक्यांत आणलीं आहेत. विवाह हा करार नसून संस्कार आहे अशी काहींशीं समजूत बराच काळ आमच्यांत मूळ धरून असल्यानें निदान लग्नसंस्थेस तरी विज्ञापनाविद्येचे वळसे मिळणार नाहीत, अशी बऱ्याच अल्पदृष्टि आशावाद्यांची अपेक्षा होती. परंतु लग्न हा संस्कार नव्हे, तो दोन भिन्नलिंगी व्यक्तींच्या दरम्यान होणारा एक रोखठोक करारच आहे. ह्या पुरोगामी कल्पनेच्या प्रसारासरशीं लग्नमंडपांतील वधूवरें हीं देखील विज्ञापनविशारदाच्या हातांतलीं खेळणीं होऊन बसलीं. एकेकाळीं आमच्या वधू कोणाकडे दृष्टि उचलून पहात नसत व त्यांच्याकडे दृष्टि लावणेंहि अप्रशस्त मानलें जात असें परंतु विवाह हा करार आहे, ह्या पुरोगामी कल्पनेच्या उदयानंतर अर्थातच तरुणतरुणींचें व त्यांच्या विवाहाचें भांडवल करणाऱ्या "शुभमंगल सावधान" मंडळ्या जन्मास आल्या व त्यांनीं उपवर पोरींना व उपवधू पोरांना इंचाच्या हिशेबानें विज्ञापनाच्या चौकोनी मखरांत, दडपून बसवावयास धडाडीनें प्रारंभ केला. "पाहिजे—गोऱ्या, सुदृढ, बांधेसूद अव्यंग, धुष्टपुष्ट, कुरळ्यां केसांच्या,

घाऱ्या डोळ्यांच्या व पस्तीस वर्षांच्या कोंकणस्थ वधूस पोटशाखेंतील प्रथम-वर, बिजवर किंवा तिजवर पाहिजे. रूप, पैसा, शिक्षण ह्याविषयीं विशेष अटी नाहींत. वधूचें छायाचित्र कोणत्याहि परिस्थितींत दाखविलें जाणार नाहीं. लिहा अगर भेटा—विवाह मोडजोड मंडळ. लंगोट्या मारुतीच्या पिछाडीस." अशातऱ्हेचीं विज्ञापनें थोड्याच दशकांपूर्वी अगदीं अचिंत्य होतीं. पण आतां युगधर्माच्या प्रभावेंकरून लग्नमंडपांतील काव्यमय बोहोल्यास मंडईतील कर्कश चौथऱ्याची कळा आली व तेथें वधुवरांचा लिलांव पुकारणारे डोंब खुशाल एखाद्या कुमारिचा हात ओढून तिच्या सुदृढतेविषयीं, बांध्याविषयीं, वर्णाविषयीं व वयाविषयीं धंदेवाईक पुकारा करूं लागले. " वर पाहिजे " व " वधू पाहिजे " चे सवाल जबाब हा वृत्तसृष्टीचा परिचित विषय होऊन, नटींच्या छायाचित्राच्या बरोबरीनें वधूंची छाया-चित्रेंहि तुरळक प्रमाणांत व योग्य दामांत छापलीं जाऊं लागलीं विज्ञापन-विद्येचा स्वैरसंचार आमच्या स्नानगृहांत, भोजनगृहांत शयनगृहांत, येवढेच नव्हे तर आमच्या लग्नमंडपातहि अकुंठित गतीनें सुरू झाला. आमच्या जन्माचीं विज्ञापनें येऊं लागलीं. आमच्या मरणाचीं विज्ञापनें येऊं लागलीं ( त्यांचा स्वभाव फार प्रेमळ, ममताळू, व उदार होता. त्याच्या मृत्युमुळे आम्हीं सर्व भावंडें पोरकीं झालीं आहोंत. ईश्वर मृतात्म्यास शांति देवो इत्यादि ) व आमच्या विवाहाचीहि विज्ञापनें येऊं लागलीं. ( सुरेंद्र बत्रा सुपुत्र कॅप्टन व मिसेस बत्रा ह्यांचा शुभविवाह अमृत कौर, सुकन्या किशनचंद मिसेस गौबा, पिटाचे कंत्राटदार ( मिसेस गौबा नव्हत ! ) ह्यांच्याशीं रोहतक येथें नुकताच मोठ्या समारंभानें पार पडला—वधुवराचा हातांत हात अथवा खांद्यावर हात घातलेला फोटो इ. ) विज्ञापनापासून आमचें रक्षण करणारा त्राता आतां कोणी उरला नाहीं. वृत्तपत्रांत तर विज्ञापनें आहेतच. ( कारण ती लिखाणांचा व द्रव्याचा प्रश्न एकदमच सोडवितात ) परंतु ट्रामगाडींत विज्ञापनें आहेत, आगगाडींत विज्ञापनें

आहेत, दिनदर्शिकेवर विज्ञापनें आहेत, भिंतीवर विज्ञापनें आहेत, मार्गाच्या कडेनें विज्ञापनें आहेत, उजेडांत विज्ञापनें आहेत, अंधेरांत एखाद्या राक्षसाप्रमाणें लाल निळे डोळे मिचकावून आम्हांस भेडसावणारीं विज्ञापनें येवढेंच नव्हे तर ह्या गांवाला कंटाळून तुम्हीं खंडाळ्याच्या घाटांत पळालात तरी तेथें मोक्याच्या जागेवरून तुमच्या दिशेनें विज्ञापनाची मारगिरी चालूं आहेच ! ह्या विषयांत सरकारास शरण जाण्यातही काहीं तात्पर्य नाहीं ! कारण प्रसिद्धीप्रकटन विभागाचें रूपानें उलट विज्ञापनशास्त्रास शरण गेलें आहे व तेंच तुम्हांस "अधिक धान्य पिकवा" "कमी धान्य खा" "जास्त कापड घेऊं नका" अशा विज्ञापना वारंवार ऐकवीत असतें. प्रत्यक्ष सरकारची जेथें ही अवस्था तेथें "अवश्य तेव्हांच प्रवास करा" "हलका प्रवास करा" आदि जाहिरातवजा फर्मानें सोडणाऱ्या बिचाऱ्या रेल्वेमंडळ्यांस काय दोष द्यावा ! विज्ञापनविद्येचा भस्मासुरी वरदहस्त साऱ्यांच्याच मस्तकांवर पडलेला आहे.

* * *

विज्ञापनविशारदाचे कांहीं संकेत व काहीं शब्दप्रयोग आता आमच्या भाषेंत अढळपद घेण्याच्या बेतांत आहेत. "टपाल खर्च माफ" "ट. ख. वेगळा" "हातानें अस्पृष्ट" "सेल ! रिडक्शन सेल !" "लहान मुलेंहि हें आवडीनें घेनात" "होऊं नये गोष्ट झाली" "पुणेकरांची सोय" "Dont let this Happen to you" "कुशन बाबांचा संदेश" ( व चेहरा ) "श. वा." ह्या साऱ्यास आतां अक्षर वाङ्मयाचा दर्जा व खुमारी प्राप्त झाली आहे. विज्ञापकांचे बुद्धिचापल्य, धाडस ( धारिष्ट ?) जाणती व अजाणती विनोदबुद्धि, भाषाज्ञान ( वा अज्ञान ) हे व असेच गुणावगुण त्यांच्या ह्या यशास कारणीभूत

होत. स्वतःचा शहाजोगपणा सिद्ध करण्यासाठीं त्यांना आलेलीं म्हणून जी प्रशस्तिपत्रें ते मोठ्या विजयोन्मादानें प्रश्नार्थी चेहेरे करणाऱ्या जगाच्या तोंडावर भिरकवतात. तेथें त्यांच्या या साऱ्या गुणांचा दैदिप्यमान प्रकर्ष पहावयास मिळतो. "मच्छरारी"च्या निर्मात्यास आलेलें हें प्रशस्तिपत्र पहा. "आपल्या मच्छरारी पावडरचा विलक्षण गुण पाहून थक्क झालों. भुकटीचे चार दोन फुवारें हवेंत उडवितांच कँपातलीं सारीं मच्छरें तर क्षणार्धांत मेलींच, पण आकाशात उडणाऱ्या वारीहि ॲक-ॲक बंदुकींची गोळी लागलेल्या विमानाप्रमाणें भुईवर कोसळल्या. मी व माझ्या मित्रांनीं त्याचें मांस मोठ्या आनंदानें खाल्लें. ह्या मध्यपूर्वेंतील दलदलीच्या रणभूमींवर उपासमार झालेल्या आम्हांवर मच्छरें मेजवानी झोडींत; पण मच्छराच्या निमित्तानें व आपल्या पावडरच्या प्रतापानें आम्हांसच त्या दिवशीं मेजवानी मिळाली. मच्छरांचाच नव्हे तर आमच्याहि पोटाचा प्रश्न अशा रितीनें अकस्मात सुटला हें कळविण्यास आनंद वाटतो. आणखी दोनशे डबे पाठवा. आपला उपकृत **जॉन स्मिथ (कर्नल)** मध्यपूर्व आघाडीवर कोठेतरी.

**टीप**—"माझा निश्चित ठावठिकाणा सांगणें हिज मॅजेस्टीच्या कायद्यास धरून होणार नसल्यानें तो सांगता येत नाहीं. दिलगीर आहे.

"**जॉनस्मिथ (कर्नल)**"

"केशकुठार" व "केशविहार" नांवाचीं केसांचें उच्चाटण व त्याचें संवर्धन करणारीं दोन आवळीं जावळीं तेलें विकणाऱ्या मंडळीस त्यांच्या उभय तेलांच्या अजब गुणकारित्वाविषयीं पुढील प्रशस्तिपत्र मिळालें होतें.

"व्यवस्थापक केशसंचार मंडळी यांस, माझ्या माहितींतील एक सोवळी विधवा नाभिकांच्या संपामुळें जेर आली होती. तिला आपले

" केशकुठार " देतांच तिच्या जन्माचा प्रश्न आमूलाग्र सुटला. तसेंच दुसऱ्या एका तरुण विकेशा गतविधवेस पंधरा दिवसांत पुनर्लग्न करण्याची निकड उत्पन्न झाली होती. तिला आपलें 'केशविहार" मी लावावयास दिलें. काय आश्चर्य ! चवदा दिवसातच तिचे केस टांचेवर लोळूं लागले. आपण हें पत्र अवश्य प्रसिद्ध करावें मी सांगितलेल्या हकीकतींत कोठें बालमात्र फरक आढळणार नाहीं. आपलीं तेलें म्हणजे एक वरदानच होय ! आपलीं तेलें उपलब्ध असता अद्याप जगात टक्कल व केंसाळपणा सापडावा याचेंच महादाश्चर्य वाटतें ! दोन्ही तेलांचे दोन ग्रोस शिसे पाठविणें आपला–गणपती ठोंचे ( S. M. C. ). थंडीवरील रामबाण दवाईच्या विज्ञापकानें पुढील प्रशस्तिपत्र प्रसिद्ध केलें.

" टाहिटी (प्रशांतसागर) येथून मि. मूळजी मंगोपार्क कळवितात. आपली थंडीवरील दवा अद्भुत आहे. ती घेतल्यावर मला कडाक्याच्या हिवाळ्यात देखील थंडी वाजेना ! माझा गरम कपड्यांचा खर्च अजिबात वाचला ! येत्या हिवाळ्यांत आमची टोळी उत्तर ध्रुवाकडे जाणार आहे. तरी दोन डझन बाटल्या त्वरित तारेनें पाठविणें ". आणि हें "धेनुवल्लभ" ताईतास मिळालेल्या असंख्य सर्टिफिकिटांपैकीं एक—

" साष्टांग दंडवत. आपणास धेनुवल्लभ ताईताची आर्डर देतांच त्याचा अजब गुण दिसूं लागला. बडतर्फ झालों होतों तो नोकरीवर घेतला गेलों. मनपसंत पोरीशी लग्न लागलें. हितशत्रूंचा फज्जा उडाला. हेर हिटलेर किंवा टोजो ह्यांस आपल्या ताईताचें सामर्थ्य माहित नव्हतें हें दुर्दैव. एरवीं त्यांचेहि सारे मनोरथ सफल झाले असते. आपण जर्मनी व जपानी भाषात आपलें ॲडव्हरटाईज देत नव्हतात काय ? आतां तरी तसें करावें व सर्वच मनुष्यमात्रांचे आशीर्वाद घ्यावें.

आपला–गोमा गणेश."

आणि आतां हें परमयोगिनी गोदाबाईस गेलेलें कृतज्ञ पत्र.

"गोदाबाईचें सेवेशीं. आपल्या कृपेनें माझ्या घरींहि पाळणा हलूं लागला. दोन वर्षांत कांहीं नव्हतें तें आतां एकदम जुळीं झालीं. नम्र विनंति इतकीच कीं आपण आपल्या गंड्या समवेतच पाळण्यांचा जोड कारखानाहि काढावा. म्हणजे "एक पंथ दो काज" असें होईल. बहुत काय लिहिणें ?

आपला–भवानराव बावळे,
ईस्ट आफ्रीका."

असंख्य विज्ञापनकारांस आलेल्या अनंत पत्रांपैकीं—नमुन्यासाठीं कांहीं थोडीं देणेंच त्यांच्याप्रमाणें आम्हांसहि शक्य आहे. विज्ञापनांतील अथवा त्या विज्ञापनास मिळालेल्या प्रशस्तिपत्रांतील थोडाहि भाग प्रत्यक्षांत उतरला तर मोठी मौज, कल्लोळ, हाहाःकार आणि गोंधळ उडणार आहे.

"वशीकरण" यंत्राच्या प्रभावामुळें रंगेल तरुणांच्या पालटत्या लहरीनुसार स्त्रीवर्गाची ओढाताण होऊं लागेल ! वशीकरण यंत्र वापरणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या धूमधडाक्यांत विवाहसंस्थेच्या ठिकऱ्या उडतील. नैतिक उपदेश करणाऱ्या पुस्तकांस सर्पणाचेंहि मोल उरणार नाहीं. यंत्राच्या सहाय्यानें एकाच पुरुषास वश करावयास दोन किंवा अधिक स्त्रिया व एकाच स्त्रीस वश करावयास दोन किंवा अधिक पुरुष धडपडूं लागल्यास त्या गोंधळास पारावार उरणार नाहीं !

घरोघर "पाळणे हलविणाऱ्या गंड्या"चा प्रतापहि कांहीं सामान्य असणार नाहीं. असे पाळणे घरोघर हलूं लागले तर लोकसंख्येचा प्रश्न व मालथसाचा सिद्धांत इतकें विक्राळ स्वरूप धारण करील कीं त्यावर

अणुमेलकाचा मर्राम उपयोग, एवढाच एक मवाळांतला मवाळ उपाय शिल्लक राहिला.

※

तमाम रोगांचे उच्चाटण करणाऱ्या औषधाचा परिणाम टाळणे हलविण्याच्या व वशीकरण यंत्राच्या कार्यक्रमास भयानक रीत्या पूरकच होईल. जगांत आजार, वाईट प्रकृति, खंगलेली देहयष्टि म्हणून दृष्टीस पडणार नाहीं. व वशीकरण यंत्रे बांधून पुन्हां कायमची रोगमुक्त झालेली ही टाळण्यातली पैदास जगांत नुसतां धुमाकूळ माडील. शिवाय रामबाण औषधाच्या प्रभावानें जगांतील तमाम रोगांचें एकदा उच्चाटण झालें कीं ह्या दिव्य औषधींच्या विक्रेत्याचें वा त्यांच्या औषधींचेंहि उच्चाटण व्हावयास विलंब लागणार नाहीं. ह्या साऱ्या उत्पातात जरठास तारूण्य व तरुणास अतितारुण्य देणाऱ्या "मर्म मोदकांनीं" आपला इब्लिस गुण दाखवावयास प्रारंभ केला तर काय प्रळय होइल ह्याची कल्पनाच करवत नाहीं ! त्यापरीस विज्ञापनविशारदांचीं वचनें त्यांच्या ग्राहकांचें कोट कल्याण करण्याऐवजी त्यांचें स्वतःचें कोटकल्याण करून स्वप्नरंजनातच विराम पावत आहेत, हेंच एकंदरींत जगाच्या दृष्टीनें ठीक आहे.

—नवा झंकार, दिवाळी १९४८.

# ताजमहाल

## दिव्य प्रेमाचें प्रतीक कीं...?

ताजमहालच्या सौंदर्याचीं स्तोत्रें आपण सगळयांनींच ऐकलीं आहेत. कविलोकांनीं, लेखकलोकांनीं, फिरत्या प्रवाशांनीं, इन्शुअरन्स मंडळीच्या प्रचारकांनीं, आगगाडीच्या वेळापत्रककारांनीं, "जी. आय्. पी." च्या विज्ञापकांनीं व "बी. बी." च्या चितार्‍यांनीं आपआपल्या शक्तीप्रमाणें ह्या विषयावर पुष्कळच दम खर्चीं घातला आहे. कुणी ताजमंदिराचें वर्णन "A Dream in Marble"–(संगमरवरी स्वप्न) म्हणून केलें, तर कुणाला वाटलें कीं हा जणूं तीनचारशें राण्याचें खिल्लार बाळगणार्‍या दर्देदिल शहाजहाननें अर्जमंदबानूसाठीं ढाळलेला हिशेबी असा एकुलता एक संगमरवरी अश्रु आहे. ("A Tear in Marble") एकूण काय, कीं गेल्या तीनशें वर्षांत ताजच्या वतीनें कोणाही सामान्य माणसाची छाती व बुद्धि दडपून जाईल इतका प्रचार झालेला आहे. ताजवर केवळ कविता करूनच लोक स्वस्थ बसले नाहींत. दिव्य प्रेमाच्या ह्या प्रतिकाला गचांडी मारून धूर्त वणिकांनीं व्यापाराच्या मासळी हारांतही धडपडत धाडलें! कुणी ताजच्या नांवानें सुग्रास भोजनें देणारीं हॉटेलें काढलीं, कुणी खर्डेघांशा मंडळीस उपयुक्त अशा लेखण्या काढल्या, कुणी सर्व जनतेस उपयोगीं अशीं पटगृहें काढलीं, तर कुणी मस्तकें बोडणारीं केशकर्तनालयें! आपल्या स्वर्गीय प्रेमप्रतीकाची दोन

तीन शतकांच्या आंत अशी सार्वजनिक खाणावळ झाल्याचें पाहून त्या भुवनसुंदरी मुमताजला व तिच्या शाही प्रियकराला हातांत कुदळ घेऊन



परत आग्र्यावर उडी मारण्याचा मोह अनावर होत असेल! काय हजाम, धोबडे, हॉटेलवाले, दिनदर्शावाले ह्यांनींहि त्या कोमल वस्तूशीं इतकी रागडी लगट करावी? कवि आणि लेखकांचें तर कांहीं विचारूं नका! लिखाण रचावयास शिमेंट, चुना, दगड, माती असल्या महागा मोलाच्या वस्तूंची दुर्दैवानें आवश्यकता लागत नसल्यामुळें ताजवर लेखणीचें कांहीं तरी गवंडी काम केल्याविना एका लेखकाला चैन पडलें असेल तर हराम! तीनशें वर्षें सतत हा अनन्वित प्रकार चालू आहे व जगांतून एक तर ताजची इमारत किंवा लेखकांची जात नष्ट होऊन जाईपर्यंत तो तसाच चालू राहणार आहे!

ताजच्या विषयात कांहीं गळेपडू साहित्यिकांनीं तर असा कांहीं विव्हळून हंबरडा फोडला आहे कीं कुणाला वाटावें जणूं कांहीं प्रत्यक्ष शहाजहानपेक्षांहि मुमताज व ताजच्या विषयांत जर कुणाला छाती पिटयाचा अधिकार असेल, तर तो यांनाच! ताजच्या अनेकविध वर्णनापायीं

आजवर जितके श्रम व पैका वेंचला गेला आहे, तेवढ्यात दुसरा एखादा ताज सहजच उठवितां आला असता व त्या अतिरंजित वर्णनाचे भाविक



प्रवाशाला जे दुष्परिणाम भोगावे लागत आहेत, ते टळले असते. कारण ताजच्या सौंदर्याविषयींचीं झाडून सारीं वर्णनें अतिरंजित आहेत. कपाळा-वर हात मारून घेण्यासारखी गोष्ट अशी कीं ताजच्या नजाकतीवर अगदीं स्फुंदून कविता करणाऱ्यांपैकीं अनेकांनीं ताज मुळीं कधीं पाहिलेलाच नाहीं ! त्यांच्याजवळ आग्र्याच्या तिकिटापुरते पैसेच कधीं नव्हते ! केवळ अलंकारिक अफवांवर विसंबून ताजाविषयीं ते सद्गदित होत राहिले ! ताजमध्यें जें मुळींच नाहीं, तें त्यांनीं आपल्या कल्पनामिनारात वठविलें ! परिणाम असा झाला कीं अतिरंजनाचे माणिकमोती ल्यालेला काल्पनिक ताजच प्रत्यक्षापेक्षा फार सुंदर वठला ! वर्णनांनीं वस्तुस्थितीला ठार केलें ! ताज न पाहतां ताजस्तुति गाणारे व ताज न पाहतांच ती स्तुति वाचून माना डोलवणारे अशा उभय रसिकांचा संप्रदाय इतका फोफावला, कीं त्यापायीं ताज पाहून प्रामाणिक मत बनवूं इच्छिणारा व ताज पाहिल्यावर स्वतंत्र मत सांगूं इच्छिणारा प्रवासी पार गुदमरून गेला. ताज न पाहा-णाऱ्यांचा स्तुतिपर गल्ला इतका वाढला कीं त्यांच्यापुढें ताज पाहून आलेल्या क्षुद्र जीवाला तोंड उघडण्याची सोय उरली नाहीं ! उलट त्याला असेंच वाटूं लागलें, कीं ताज नांवाची सुंदर इमारत खरोखर ह्याच भाग्य-

वंतानीं पाहिली आहे; आपण मात्र कुठल्या तरी पांढऱ्या दगडांचा एक ढीग व मिनार घुमटांची गोळाबेरीज पाहून परत आलों! ताजाविषयीं गोष्टी निघतांच ब्रह्मानंदी टाळी लागल्यासारखा चेहरा करून "ताजमहाल ना? वाः-वाः! ताजाविषयीं काय बोलायचें आहे, महाराजा!" असें म्हण-ण्याची पद्धत अगदीं रूढ होऊन गेली. ताजसौंदर्याच्या दंतकथा आणि अफवा अनावरपणें वाढल्या व वेदवाक्याइतक्या प्रमाण होऊन बसल्या. त्या भरांत रसिकवृंद हें विसरून गेला कीं "संगमरवरी अश्रु" "संगमर-वरीं स्वप्न" "संगमरवरी हुंदका" (A Sob in Marble) हीं ताज़चीं वर्णनेंच प्रत्यक्षापेक्षा फार अधिक सुंदर असण्याचा संभव आहे! आणि हेंहि विसरून गेला कीं रेल्वे मंडळया, खाणावळवाले, टांगेवाले, ताजच्या जिवावर जगणारे पैगंबरधर्मी व संगमरवरी खेळण्यांचे व्यापारी ह्या साऱ्या धंदेवाईक मंडळींनीं आपल्याविरुद्ध कट केलेला आहे!

हिंदुस्थानातल्या भाविक मूर्खपणाची गणना करण्यासाठीं ताज-महालाला मी अनेकदा भेट दिली आहे. एकोणीसशें एकूणचाळीसांत मी ताज पाहिला आहे. बेचाळीसांत पाहिला आहे. आणि अगदीं शेवटीं ऑगस्ट शेहेचाळीसांत पाहिला आहे. फटफटल्या पहांटे शहा-मुमताजच्या झोंपलेल्या हाडांना रामरामी द्यावयास मी तेथें गेलों आहें. ऐन दुपारीं तेथें झोंपलेल्या त्या दांपत्याची वास्तुपुस्त मीं केली आहे व रात्रीच्या वेळीं त्या निद्रामग्न प्रेमीजनांना छेडण्याइतका धसमुसळेपणाहि माझ्याकडून घडला आहे. एकेका भेटींत अर्धा डझन वेळा मीं ताजला दर्शन दिलें, व प्रत्येक वेळीं पाव डझन तास तेथें घालविले. कोसळत्या पावसांत स्वच्छ प्रकाशांत, कडक थंडींत व दाह करणाऱ्या उन्हांत मीं ताज पाहिला. टिपूर चांदण्यांत, मावळत्या उजेडांत व गर्द अंधारांत अस्वस्थपणें आसमंतात भटकतांना मला ताजनें पाहिलें. अनेक काळीं अनेक प्रसंगीं

व अनेक ऋतूंत मी व ताज परस्पराकडे थंड चिकित्सेनें पाहत उभे राहिलों आहोंत. न गवसणारें सौंदर्य शोधण्याचा प्रत्येक वेळीं मीं कसून प्रयत्न केला, व प्रत्येक वेळीं नवी कुरूपता शोधून काढण्यांत यश मिळविलें. मोंगल परंपरा ध्यानांत घेऊन मोंगली कलेचें मर्म हुडकण्यास साहाय्य व्हावें म्हणून चारदोनदा तर मी भरपूर दारू पिऊन ताजसमोर खडा झालों, पण धुंदींत देखील दिव्य प्रेमाच्या सौंदर्याचा साक्षात्कार होण्या-ऐवजीं माझी दारू मात्र खाडकन् उतरली ! छेः–छेः ! ताजमहाल हें दिव्य प्रेमाचें प्रतीक नाहींच ! त्या जुनाट इमारतीचें सौंदर्य केवळ काल्पनिक आहे ! शिल्पसंपत्तीनें समृद्ध झालेल्या मीनाक्षी कौणार्क, भुवनेश्वर वा हंपी मंदिराच्या एकाद्या पायरीचीहि सर ताज नांवाच्या दफनस्थानला येणार नाहीं ! मीनाक्षी मंदिराच्या पवित्र सौंदर्याविषयीं शाब्दिक अतिशयोक्ति करतां येणारच नाहीं. हिमालयाची भव्य रमणीयता कोणत्याहि रमणीय कवितेपेक्षा नेहमींच अनंत पटींनीं अधिक भव्य व सुंदर राहणार आहे. ज्याविषयीं अतिरंजन होऊं शकेल असें तें सौंदर्यच नाहीं. तेथे शब्द निःशब्द होतील व स्तुतिस्तोत्र क्षुद्र वाटेल; परंतु अतिरंजन, अतिशयोक्ति व अफवा हाच ताजच्या सौंदर्याचा आदि, अंत आणि मध्य आहे. मीनाक्षी अतिशयोक्तीच्या पार आहे व कृत्रिम अतिशयोक्ति हाच ताजचा प्रत्येक अर्थानें पाया आहे. हिमालय व मीनाक्षी हीं त्यांच्या वर्णनापेक्षां नेहमींच श्रेष्ठ आहेत, व ताज हा ताजस्तुतीपेक्षा फारच कनिष्ठ आहे. न पाहिलेला ताज हा पाहिलेल्या ताजपेक्षां अधिक सुंदर आहे. ह्या सत्याचें प्रत्यंतर माझ्यासमवेत टिल्या देशपांडेनें ऑगस्ट एकोणीसशें शेचाळीस इसवींत वारंवार घेतलें, त्याचें त्रोटक इतिवृत्त सादर करीत आहे.

प्रातःकाळची वेळ होती ( असणारच ! ) आग्राकॅंट ठाणें मागें टाकून ग्रॅण्ड ट्रॅंक गाडी राजाकी मंडीला थबकली. राजाकी मंडी स्टेशन

अधिक भिकार कीं त्याच्या चारी अंगांनीं दाटलेली गलिच्छ वस्ती अधिक भिकार ह्याविषयीं टिल्या देशपांडेचा निर्णय होत नव्हता. राजाकी मंडी स्टेशनच्या मार्गेच " महाराष्ट्र समाज " आहे हें मला माहित असतांहि " ह्युएट पार्क " व " बेलनगंज " मार्गे चारदोन मैलांची प्रदक्षिणा देऊन " समाजां "त सुखरूप पोहोंचवून देण्याचें आश्वासन कांहीं होतकरू एक्केवाले आम्हांस कळवळून देत होते. त्यांच्या चतुर धाडसाचें कौतुक करीत आम्ही डाव्या बाजूच्या एका बोळकांडींत शिरलों. येथील उद्योगमग्न चांभारांचीं दुअंगी दुकानें पाहून टिल्या घाबरून ओरडला.

" आपण महाराष्ट्र समाजांत जात आहोंत कीं चर्मकार समाजात ?"

" महाराष्ट्र समाजांत ! " ओल्या चामडयाचा वास रुमालानें थोपविण्याचा प्रयत्न करीत मी म्हणालों.

" फार गलिच्छ वस्ती आहे !" टिल्या म्हणाला.

" अधिक गलिच्छ काय आहे ? वस्ती कीं रेल्वे ठाणें ? " मीं विचारलें

" ठाण्यावर असतांना ठाणें अधिक गलिच्छ वाटतें व वस्तींत आलें की वस्ती अधिक गलिच्छ वाटते ! " बिरबल बोलींत टिल्या उत्तरला. " धूळ तरी किती आहे ! " वातावरणांत डोळे फिरवीत तो पुढें म्हणाला, " शहाजहान, जहांगीर, नूरजहान, मुमताज वगैरे पैसेवाल्या आणि कोंवळया मंडळींनीं एवढ्या धुळीनें भरलेल्या रुक्ष गांवांत राहावें म्हणजे आश्चर्य आहे !"

" आग्र्याच्या धुळींत मिसळण्याची ते तेव्हांपासूनच संवय करीत होते !" रस्त्यावर पडलेलें एक छोटें मडकें बुटानें उडवून देत मी म्हणालों, " ते पहा पोपट ! "

जन्मांत प्रथमच पोपट पाहणाऱ्या बालकाच्या स्वरांत टिल्या ओरडला, " ब–ब–ब ! शेंकडों पोपट इथं उडताहेत, पण अजून कुठें एक कावळा दिसत असेल तर शपथ ! "

" हें राघू–मैनाचं गांव आहे; पुणं नव्हे ! " मी म्हणालों.

" तरीच इकडच्या यवन सुंदरींचीं चित्रं मनगटांवर पोपट, नाहीं तर नाकाशीं फूल घेऊन काढलेलीं दिसनात." आभाळातून ओरडत जाणाऱ्या शेवटच्या पोपटाकडे पाहत असताच टिल्याला पुन्हा उष्णता, धूळ व पाऊस ह्यांची जाणीव झाली आणि अविधाच्या मूर्खपणाचा आढावा घेत तो कुरकुरला, " त्यापेक्षा शहाजहाननं ताजमहाल माथेरानला किंवा शिमल्याला कां बांधला नाहीं, काहीं कळत नाहीं ! मॅलेट साहेबानं माथेरान हुडकून काढलं, पण अदिलशहाला काहीं तेवढी बुद्धि सुचली नाहीं ! आणि हा शहाजहान सुद्धा शिमला, नैनीताल नाहींतर मसुरी-ऐवजीं आपला इंथ धुळींत प्रेमाचे गुलाब चिवडीत बसला ! "

" ताजमहाल, माथेरान किंवा शिमल्याला बांधला असता, तर तो बांधला जाण्यापूर्वींच वाहून गेला असता." मी म्हणालों.

" बरं झालं असतं ! मग ह्या मळकट गांवात यायचा इतक्या लोकांना त्रास तरी पडला नसता ! " नाकांत ढालीसारखी नथ घालून हात हेलकावीत जाणाऱ्या एका रमणीकडे पाहत टिल्या म्हणाला. इतरहि काहीं जात्यायेत्या बुरख्यांतील सुंदर स्त्रियांकडे तो पाहत होता. इतक्यांत अंगावर गर्दी करणाऱ्या ढगांस धक्का मारून सूर्य आकाशांतून डोकावला व एक अंतर्वस्त्रविहीन पण तोंडभर बुरखा घेतलेल्या स्त्रीच्या देहावर आपादमस्तक त्याचा प्रकाश पडला. क्षणभर टिल्यानें डोळे ताणले व मिटून घेतले.

"कशाला ह्या बायका इतका तोंडभर बुरखा घेतात कोण जाणें !" कासावीस होऊन तो म्हणाला, "तोंड झांकण्याच्या खटाटोपांत बाकी सगळीकडे या दुर्लक्ष करताहेत !"

"यावनी बुरख्यांचा हाच विशेष आहे." समजावणीच्या स्वरांत मीं म्हणालों, "तोंड झांकणं हेंच इथें महत्त्वाचं मानलं जातं !"

"बरोबर आहे !" अश्लील विनोदाची पूर्वतयारी करीत टिल्या म्हणाला, "बरोबर आहे ! तोंडावरूनच माणसांची ओळख पटत असते. इतर अवयव सगळ्यांचेच सारखे असतात. तेव्हां तोंड झाकून ठेवणंच दूरदर्शीपणाचं आहे."

वाचकांसाठी एक स्पष्टीकरण करणें अवश्य आहे. एवढ्या लांब संभाषणाला पुरेल इतकी त्या चांभारगल्लीची लांबी नव्हती. आतां आम्हीं समाजात जाऊन मळके कपडे पालटून व्यवस्थापक म्हसकर महाशया-समवेत चहा पिऊन भ्रमन्तीसाठी बाहेर पडलों होतों: इतमद-उद्-दौला, किनारी बाजार, सिकंदरा, ड्रमंड रस्ता, दयालबाग, आग्रा कांत, आग्रा फोर्ट वगैरे जे काही ठरीव झटके प्रत्येक प्रवासी घेत असतो, ते सारे आम्हींहि यथावकाश घेतले व नंतर आमचा टांगा साहेब लोकांनीं बाधलेल्या उत्तम सडकेवरून कांहीं काळ धांवत राहिला आणि नंतर थांबला. टांग्याच्या गतीनें व संगीतानें टिल्या देशपांडेला जरा डुलकी लागली होती.

टांगा थाबतांच टिल्या चिडून जागा झाला व विचारूं लागला, "एऽ ! टांगा किसलिये रोखता हय ?"

टिल्याच्या मराठी हिंदीचा टांगेवाल्याला नीटसा बोध न झाल्या-मुळें मी म्हणालों, टिल्या, उतर लेका खालीं !"

"अरे, पण आपल्याला ताज पाहायला जायचं होतं ना ?" टिल्या निरुपायानें खालीं उतरत म्हणाला.

"तर मग तें समोर काय दिसत आहे ?"

"तो ताज !" त्यानें श्वास रोखून छाती बडवली.

"अर्थात्‌च !"

"जगांतलें आठवें का नववें आश्चर्य ?"

"तुझ्या विषयांत दहावें !"

"तो समोर चार दोन मिनार आणि पालथीं मडकीं घातल्या-सारखे घुमट दिसताहेत ते ?"

"होय !"

"हेंच तें संगमरवरी स्वप्न ?" डोळे किलकिले करून एकदां ताजकडे व एकदां तेवढ्यातल्या तेवढ्यांत हिरवळीवरचें गवत कुरतडू पाह-णाऱ्या टांग्याच्या प्रयत्नवादी घोड्याकडे पाहत टिल्या किंचाळला.

"हेंच !"

"फार चमत्कारिक स्वप्न आहे ! आणि शहाजहाननं मुमताजसाठीं सांडलेला संगमरवरी अश्रु तो हाच अं ?" टिल्याच्या डोळ्यांत पाणी आलें.

"होय !"

"मरतां मरतां शहाजहाननं बायकोला असं बनवावं !"

"का रे बाबा ?"

"अशा घुमट मिनाराच्या इमारती तर मीं गांवगन्ना पाहिल्या आहेत ! जिथं जिथं मुसलमान गेले तिथं तिथं हें कंटाळवाणं प्रकरण आहेच ! आणि इथेंच कां तें प्रणयी युगुल चिरनिद्रेंत मग्न झालं आहे !"

"असं मानायला प्रत्यवाय नाहीं !"

"ही तर एखाद्या घोरासुराचीहि झोप उडवेल अशी जागा आहे! प्रणयी युगुलाचं राहूं द्या! आणि ती समोरच्या दाराला खेटून कोणती घाणेरडी वस्ती आहे?"

"नो ताजपुरा!"

"प्रणयी जनांनीं सोबत तर मोठी छान निवडली आहे!"

एक ओटा, दुसरा ओटा, बाहेरचा परकोट, आतला परकोट, दोनचार दिशांना दोन चार प्रवेशद्वारें, ओवऱ्यामध्यें मुख्य इमारत, आजूबाजूला पुष्करणी, पाट, झाडपाला, एखादी मशिद, पटांगण, घुमट आणि मिनार, आणि महिरपदार द्वारें, खालीं पाताळांत अंधेरी कबर, वर तिचा मुखवटा, चित्रें विकणारे व्यापारी, सोडावॉटरवाले, जोड्याचे रखवालदार, फुलें विकणारे, वाटाडे, मार्गदर्शिका विकणारे, व्यापारी, भिकारी, टांगेवाले, खिसेकापू, हा सारा सरंजाम सिकंदऱ्यापासून[1] (अकबराचें थडगें) तों शहादऱ्यापर्यंत[2] (सेलिमचें थडगें), [3]इतमद-उद-दौल्यापासून तों दिल्लीच्या लाल किल्ल्यापर्यंत आणि दिल्लीच्या लाल किल्ल्यापासून तों आग्र्याच्या तांबड्या किल्ल्यापर्यंत थोड्याफार भेदानें थेट सारखाच आहे. ताजच्या विषयातही त्याची कंटाळवाणी व त्रासदायक पुनरावृत्ति झालेली आहे. ताजच्या प्रतिकृति विकणारे, मोंगल सुंदरींचीं चित्रें विकणारे, मार्गदर्शनासमवेतच इतिहासात्मक दंतकथा सांगण्याचा आग्रह धरणारे, ह्या साऱ्यांना तोंड देतां देतां टिल्याच्या नाकीं दम येऊन गेला. बाहेरचें प्रांगण पार करून आता आम्ही आतल्या पटागणांत ताजसमोरच्या ओटयावर ठाण मांडून उभे होतों. खाऊं कीं गिळूं अशा दृष्टीनें तों

१ आग्रा. २ लाहोर. ३ आग्रा.

ताजकडे पाहत होता. माझ्याही मनांत जगाच्या, वैभवाच्या व ताजच्याही नश्वरतेच्या कल्पनेनें धिगाणा मांडला होता. आम्हीं जों जों त्या प्रमप्रतीकाच्या अधिक अधिक जवळ येत होतों, तों तों टिल्याची क्रोधभावना जास्त जास्त बळावत होती.

"टिल्या! आपण आतां तीनशें वर्षांमागील प्रेमप्रतीकाच्या अगदीं पुढ्यांत आहोंत! ह्या क्षणीं तूं दिव्य व अमर प्रेमाच्या भावनेनं भारून गेला आहेस कीं नाहीस बोल!" मी म्हणालों.

"अरे चल! ह्या शहाजहानपेक्षां तर माझं माझ्या बायकोवर जास्त प्रेम आहे!"

"म्हणजे ह्या शाहीप्रेमाच्या दिव्य प्रदर्शनामुळें तुझ्या भावना मुळीच उचंबळून येत नाहींत!"

"अगदीं नाहींत!"

"पण इतर हळवे लोक तर येथें सद्‌गदित होतात, रडतात, कविता करतात!"

"करीत असतील! एक तर ते स्वतः ढोंगी असतील, किंवा महामूर्ख तरी असतील!"

"का रे बाबा? वास्तविक पाहतां शहाजहानचं मुमताजविषयींचं दिव्य प्रेम ह्या ठिकाणीं व्यक्त झालेलें आहे, अशी किंवदन्ती आहे!"

"दिव्य प्रेम? पवित्र प्रेम!" घोड्यासारखा हंसून टिल्या ओरडला, "काय रे, ह्या शहाजहानला एकंदर बायका किती होत्या?"

"तीनचारशेंपेक्षां कमती निश्चित नसतील!"

"तर मग जरा कल्पना कर! तीनशें बाया स्नान करीत आहेत! तीनशें बेगमा एका लांबलचक ओळींत बसून सालन ओरपीत आहेत!



तीनशें राण्यांचे कपडे धुतले जात आहेत, त्या आजारी पडत आहेत, भांडत आहेत, आणि केवळ तीनशें साठ दिवसात हा शाही प्रियकर त्यांच्यावर प्रेम करीत आहे, आणि त्या त्याच्यावर करीत आहेत. Monstrous ! Outrageous ! Impossible ! आणि ह्या तीन-चारशें बायकांच्या दादल्याचं म्हणे मुमताजवर दिव्य, पवित्र, एकनिष्ठ प्रेम होतं ! आणि त्यांनीं म्हणे आपल्या दिव्य प्रेमाचं प्रतीक म्हणून ह्या इथें हा दगडी ताबूत उभारून ठेवला ! Tell me another !" बोलतां बोलतां टिल्याच्या तोंडाला फेस आला आणि मी मनोमन विचार करूं लागलों ! मलाही तो हिशोब भयंकर वाटूं लागला. तीनचारशें वैध आणि तीनचारशें तरी अवैध बायकांचा, शहाजहानचा आणि दिव्य

प्रेमाचा मेळ घालणें खरोखरच कठीण होतें. मुमताजशीं शहाजहान एकनिष्ठ असेल तर मग तो उरलेल्या दोनशें नव्याण्णव बायकांविषयींचें आपलें कर्तव्य करीत नव्हता. आणि त्यांच्याविषयींचें कर्तव्य शक्त्यनुसार बजावण्याचा त्यानें प्रयत्न केला असला तर तो मुमताजशीं एकनिष्ठ नव्हता. तर मग ताजमहाल पाहतांच दिव्य प्रेमाच्या कल्पनेंत सद्गदित होणारे भाविक भयंकर चूक करीत आहेत. ताजशीं एकरूप झालेली ही दिव्य प्रेमाची दंतकथा म्हणजे एक असह्य मानसिक भुलावणी आहे. त्या दंतकथेंतच ताजला दैवी सौंदर्याचा फसवा मुलामा चढविलेला आहे. तीनचारशें बायकांशीं तोंडओळख ठेवणारा शहाजहान दिव्यप्रेमी नव्हता. ताज हें शहाजहानच्या दिव्य प्रेमाचें प्रतीक मुळींच नव्हे. तें त्याच्या श्रीमंतीचें प्रतीक असेल. पक्षपातीपणाचें प्रतीक असेल. प्रजेच्या पैशाची शहाजहान किती आंधळेपणानें उधळपट्टी करीत असे,याचा तो पुरावा असेल. पण ताजचा व दिव्य प्रेमाचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. तीनशें बायका! My God! आणि चवदाव्या बाळंतपणांत कामीं आलेली ही अर्जमंदबानू याने मुमताज! तीनशें बायकांचीं बाळंतपणें! सहस्रावधि पाळणे! तीनशें बायकांचें गुंतवळफणी करंड्याच्या पेट्या, ताटवाट्या, परकर, कांचोळ्या! तीनशें बायकांचे वेगवेगळे आवाज! तीनशें प्रकारचें बोलणें हंसणें! नुसतीं त्याच्याशीं लग्नें लावतां लावतांच एक वर्ष कामीं आलें असेल! दुसरें कांहीं असूंच द्या! तीनशें बायकांचें रुसणें, कुरकुरणें, ओरडणें, रडणें आणि जळफळणें! बुरखे आणायचे तरी एकदम तीनशें! चेहरे नुसते लक्षांत ठेवायचे म्हणजे सुद्धा कठीण काम आहे! का शहाजहाननें एकेकीचें चित्र चिकटवून राणीवंशाचा एक who is who आणि उपस्थिति पुस्तकच सिद्ध करून ठेवलें होतें? तीनशें बेगमा आणि एक बादशहा! भयंकर काम असलें पाहिजे! घोटाळाच घोटाळा! वा रे वा! वा रे दिव्य प्रेम! हें प्रेम कीं प्रेमाचा घाऊक आणि किरकोळ हाट! ही झाली एका बायकोची कबर!

आणि मग त्या उरलेल्या दोनशे नव्याण्णव बिचाऱ्या कुठें आहेत ? त्यांची हाडें पुरायला किती एकर भुई कामीं आली ! सगळ्या अहेवपणीं गेल्या तर नुसत्या एकेकीचें सुतक पाळतां पाळतां दहापाच वर्षे खलास व्हायचीं !

हा हिशेब जमवता जमवता माझें मन खदखदूं लागलें आणि मीं मान वर करून समोरच्या "ताज"कडे पाहिलें. आधींच पांढरा असलेला ताज आता संकोचानें जणूं अधिकच फटफटीत पडला होता. ठिल्या दगडी दृष्टीनें ताजकडे पाहता पाहता मध्येंच पुटपुटला,

" पैशाचे खेळ आहेत सगळे ! "

" काय? " मीं बुद्धयाच विचारलें.

" नाही म्हटलं पैशाचे खेळ आहेत हे ! पैसा होता ह्या शहाजहान-पाशीं, आणखी वर बायकोच्या आशेत होता ! काढला बांधून ताजमहाल, आणि लागले लोक त्याच्या दिव्य प्रेमाच्या नांवानं कोकलायला ! "

" म्हणजे तुझं म्हणणं असं कीं शहाजहान हा एक बराच पैसेवाला, लहरी, उधळ्या, आणि थाईल्वेडा बादशाहा होता. एवढंच नव्हे तर तो बहुधा फार धूर्त असण्याचाही संभव आहे आणि म्हणून, काय केल्यामुळं दिव्य प्रेमाचा आरोप आपल्यावर होणं शक्य आहे, तें त्यानं बरोबर हेरलं ! "

" असंच मला वाटतं, आणि म्हणून इतर लोकांच्या मनात हा दगडी ढीग पाहून ज्या भावना उत्पन्न होतात, त्यापेक्षां अगदीं वेगळ्या भावना मला त्रस्त करतात ! "

ताजसमोरचा चौथरा उतरून हळूं हळूं आम्हीं पदपथाच्या डाव्या अंगाला असणाऱ्या विवरापाशीं गेलों. एक वाटाड्या आमचें मार्गदर्शन करण्याची महत्वाकांक्षा धरून राहिला होता. आम्हांला ज्ञान पाजत तो

म्हणाला, "अर्जमंदबानू बऱ्हानपूरला अल्लाघरीं गेल्याकर त्यांची लाश या कुव्यांत ठेवली गेली होती. ताजमहेल बांधून पूर्ण झाल्याकर मग तें प्रेत तिथें दफनावलें गेलें !"

मला वाटलें कीं हा हृदयद्रावक कथाभाग ऐकून तरी टिल्याचें मन द्रवेल; पण रामा शिवा गोविंदा ! ताजचें दुरून दर्शन झाल्यापासून तो सारखा थिथरत चालला होता. कडू तोंड करून आतां तो म्हणाला,—

"काय बायका असतात !"

"कां रे बाबा ?" चकित होऊन मीं विचारलें, "दोनशें नव्याण्णव सवतींसमवेत संसार करून पत्नीधर्म पाळतां पाळतां चवदाव्या बाळंतपणांत ही कामीं आली. तिला कशाला बोल लावतोस !"

"काय बायकांचा सोस असतो !"

समोरच्या खड्डयाकडे पाहत टिल्या त्याच सुरांत म्हणाला, "मरतां मरतां सुद्धा या बाईनें आपल्या नवऱ्याजवळून एक संगमरवरी दागिना मागून घेतला. कोण भयंकर हव्यास !"

माझ्यासमोर सगळा ताजमहाल कोसळून पडला असता तरी मीं जितका थक्क झालों नसतों, तितका टिल्याच्या त्या अभिनव कल्पनेमुळें झालों. "ब्रेव्हो टिल्या !" मी म्हणालों, "A Tear in Marbel, A Dream in Marble and a Trinket in Marble !"

"पाहा तर खरं !" स्वतःच्या खिशांतले पैसे ताजसाठीं खर्ची पडल्याप्रमाणें कुरकुरत तो म्हणाला.

"मरतां मरतां या बेगमेनं नवऱ्यापाशीं मागणं मागायचं काहीं सोडलं नाहीं ! आणि तें मागणं काय, तर मेल्यावर ही माझी आठवण जगाला ( आणि तुम्हांला ) राहील, असं काहीं स्मारक माझ्यासाठीं बांधा ! Vanity is thy name, oh woman !"

"चलिये बाबूजी, जरा उधर तो चलिये! असली चीज तो वो ही है." वाटाड्यानें झिंग लावलें. आम्हीं डाव्या अंगाची मशीद पाहिली, ताटावरून थोडें चालत गेलों, ताजच्या कळसाची उजव्या चौथऱ्यावरील संगमरवरी प्रतिकृति पाहिली आणि एक चबुतरा चढल्याबर इतर जोडव्यांच्या बाजारात आमचेहि जोडे टाकून देऊन दुसरा चौथरा पार करीत ताजमध्यें प्रवेश केला! हीच ती सर्व मुसलमानी जगाला ललामभूत असणारी इमारत! हाच तो ताजमहाल! हेंच तें दिव्य प्रेमाचें प्रतीक! ह्या इथें अगदी खालींच मुमताज आणि शहाजहान चिरनिद्रेंत विलीन झाले आहेत! मीं माझ्या हृदयाला हलवून जागें करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला! पण तें मख्खासारखें स्तब्धच राहिलें. उलट हंसण्याकडेच त्याची प्रवृत्ति होती. भावनांना फुंकर घालण्याचा जिवापाड खटाटोपहि मीं करून पाहिला. पण छट्! माझी भावना नुसती जागची हलेना. वरच्या अंगाला साधारण दोनचार चकरा मारून व कबरींची प्रतिकृति पाहून मग एका तिरप्या अंधेऱ्या जिन्यानें आम्ही ताजच्या ऐन गाभ्यांत शिरलों. तिथें एक लहान आणि एक मोठी अशा दोन कबरी शेजारीं होत्या. त्या पैकीं मोठी जहापन्हाची आणि छोटी बेगमसाहेबाची. त्या दोन कबरींवर अक्षय प्रेमाची प्रतीक मानली जाणारी एक मंद बत्ती होती, त्या दोन कबरी व ती एक बत्ती आणि तो अर्धअंधार पाहतांच कोमल (आणि भित्र्या?) प्रकृतीच्या मंडळींनीं एकदम रडूं लागावें असा अलिखित संकेत आहे. पण माझे व ढिल्याचे डोळे कोरडे ठणठणीत होते.

"यहां सब हिरे और मोती लगे हुए थे!" वाटाड्यानें चर्पटपंजरी सुरू केली.

"मग त्याचं आता काय झालं?"

अधाशीपणें खिशांत हात घालून ढिल्या म्हणाला.

" जाटांनीं जशीं अकबराचीं हाडं उकरून काढून खरपूस भाजलीं, आणि सिकंदरा लुटून पेटवून दिलं, तसं तर ताजचं झाल्याचं ऐकिवांत नाहीं ! " मी म्हणालों.

"नहीं साब ! लेकीन वो सब हिरे और मोती निकाले गये ! यहा सब चांदी लगी हुई थी..."

वाटाड्यानें काडी ओढली. कबरीवर आणि भिंतीवर नक्षी होती आणि त्यात अनेक रंगांचे खोटे खडे बसविले होते. काडी विझली तेव्हा टिल्या जहापन्हाच्या कबरीशीं फाजील लगट करीत आहे असें माझ्या ध्यानांत आलें. मला वाटलें, नाहीं म्हणतां म्हणतां हा अखेर भावनावश झालाच !

" अल्लाऽ ऽ हो ऽ ऽ अकबर ! "

थडग्याजवळ घुटमळणाऱ्या पैगंबरी पंड्यापैकीं एकजण दबक्या आवाजांत ओरडला व तो आवाज काही वेळ घुमत राहिला. नंतर त्या दाढीवाल्या पंड्यानें आमच्याविषयीं बराच जिव्हाळा दाखवून आमच्या-समोर हात पसरला. मी त्याचा सद्भाव परत करण्यासाठीं त्याच्या हातावर टाळी दिली व टिल्या त्याच्याशीं हस्तांदोलन करीत सुटला. हात सोडवून घेण्याचा त्या दाढीवाल्यानें बराच प्रयत्न केला, पण मी त्याच्या एका हातावर टाळ्या देतच राहिलों व टिल्या त्याचा दुसरा हात हलवीतच राहिला. अखेर त्या गरिबावर दया करून आम्हीं त्यास सोडतांच खुरपलेल्या दाढीच्या दुसऱ्या एका पंड्यानें आमच्या हातात काहीं फुलें व सबजा दिला मी शांतपणें फूल डगल्याला टोंचूं लागतांच तो पंड्या हतबुद्ध झाला आणि करुण स्वरांत मला म्हणाला,

" बाबूजी, तीं फुलें ह्या कबरीवर वहा ! "

" तें आमच्या धर्माच्या खिलाफ आहे ! " मी गुरगुरलों.

"आम्हीं सच्चे मूर्तिपूजक आहोंत, पण प्रेतपूजक नाहीं!" टिल्या म्हणाला!

"अच्छा-अच्छा बाबू" म्हणून नम्र माघार घेत दैन्यवाणा चेहरा करून पुन्हा त्या दाढीदीक्षितानें आमच्यासमोर नुमतेच हात पसरले! "कायरे, एवढा हा बादशाहा इथें तुझ्याजवळ असताना आमच्या पुढें हात पसरतोस?" मी करड्या स्वरांत म्हणालों.

"आः—आः—बाबूजी! तुम्हींच आमचे खरे बादशहा! आम्हांला तुम्ही देणार नाहीं तर पोट कसें भरेल बाबू? तुमच्यामारख्या आम्हाला पगार मिळत नाहीं. गरीबे नवाज!"—एकच प्यालयांतल्या सिंधूच्या स्वरात तो काकुळत करूं लागला. पुन्हा "अल्लाऽहोऽ अकबर" ची आरोळी उठली. पुन्हा एक काडी ओढली गेली. खिशात हात घालून मूठभर ताब्याचीं नाणीं मी त्या पंड्याच्या हातात कोंबलीं. आणि जीव फार गुदमरल्यामुळें आणि गर्दी वाढल्यामुळें आणि त्या दोन कबरींशेजारीं आमच्याहि दोन कबरी खोदण्याची वेळ येऊ नये अशी इच्छा असल्यामुळें दिव्य प्रेमाला घाईघाईनें नमस्कार करून त्याच तिरप्या जिन्यानें आम्ही पुनश्च मोकळ्यांत व प्रकाशांत आलों आणि आमच्या मागोमागच तळव्यावर नाणीं धिःकारानें आमच्यापुढें पसरून तो खुरपटलेल्या दाढीचा पंड्याहि!

"हे ग्वाल्हेरी पैसे आहेत बाबूजी! हे इथें चालणार नाहींत बाबूजी! गरीबावर रहेम करा, बाबूजी!"

करुणेच्या ताजमहालांत क्रोधाचीं हाडें लपविण्याचा प्रयत्न करीत तो चतुर यवन म्हणाला.

"ग्वालेरी पैसे आहेत!" मी खेकसलों, "तर मग ग्वाल्हेरला जाशील तेव्हा त्यांचा उपयोग कर."

माझा हा अनपेक्षित विनोद त्या अविंधालाहि इतका पटला कीं अगदीं अनिच्छेनें तो थोडा हंसला आणि एखाद्या पराभूत बोकडासारखे ओठ हलवीत निघून गेला.

" आंत फार अंधार होता ! " मी म्हणालों.

" म्हणूनच आंतली नक्षी फार सुंदर आहे असं म्हणायची सोय झाली आहे ! " टिल्या म्हणाला.

" चांदण्यातला ताज जनतेला जास्त आवडतो ! "

" चांदण्यांत आमचा बोळ, ओंकारेश्वर, नागनदी, मुळामुठा, सगळंच फार चागलं दिसतं ! दोष लपण्याची उत्तम सोय चांदण्यात असते ! "

" म्हणूनच प्रेमी जनांना चांदणं सोयीचं पडत असेल ! "—मी.

" मला गर्द अंधारातला ताज फार आवडेल. "—टिल्या म्हणाला व आम्ही ताजच्या मागच्या बाजूच्या एका खवलेदार कमानीपाशीं एकदम थबकलों. तिथें विलक्षण दुर्गंधी सुटली होती. मी जरा आंत गेलों आणि गेलों त्यापेक्षां दसपट वेगानें नाकावर रुमाल धरून परत आलों.

" काय आपले लोक आहेत ! "—मी.

" काय झालं ? " —टिल्या.

" ऐन ताजमहालांत जनतेनं असा अभिषेक करून ठेवावा ! केवढी ही प्रसिद्ध इमारत, खालीं तें चिरनिद्रेंत झोपलेलं शाही जोडपं, दिव्य प्रेमाचं सगळं वातावरण आणि इथें हा प्रकार ! "

" जाऊं दे रे ! " ताजमध्यें पाय ठेवल्यापासून अगदीं प्रथम हंसत टिल्या म्हणाला.

" यमुनेच्या पैलतीरावर बरोबर ह्या ताजच्यासमोर बादशहा शहाजहान स्वतःसाठीं काळ्या दगडांचा बरोबर असाच दुसरा इमला उठ-

विणार होता ! तो पहा त्याचा पाया !" मागे घुटमळणाऱ्या वाटाड्यानें यमुनापार बोट दाखवत चर्पटपंजारी सुरू केली.

"सुदैव आमचं कीं ती कल्पना नुमती पायापाशींच थ.बली." पलीकडे दिसणाऱ्या पायाच्या खुणांकडे पहात मी म्हणालों.

"काय रे मिया, यमुनेचं पाणी पूर आल्यावर जास्तींत जास्त किती चढतं ?" यमुनेच्या गढूळ पातळीपासून ताजच्या चौथऱ्याची उंची अजमावत टिल्यानें विचारलें.

"बावीस पंचवीस वर्षांपूर्वी ह्या पहिल्या चौथऱ्यापर्यंत एकदां पाणी येऊन गेलं, सरकार !" वाटाड्या म्हणाला.

'बाऽस !' आशाळभूतपणें दुसऱ्या चौथऱ्याकडे पाहत टिल्या म्हणाला.

"म्हणजे सरकार ? आपला मतलब ?" डोळे व तोंड फाडून वाटाड्या उद्गारला.

"कांहीं—नाहीं, कांहीं नाहीं ! चल, जरा तो डाव्या अंगाचा मिनार चढून येऊं" मी म्हणालों आणि ताजच्या मुटकुळ्याभोंवतीं चार सोटांसारख्या टोंचलेल्या मिनारापैकी एकावर आम्हीं चढून गेलों. आतां आग्रा शहराचा सगळा भकासपणा एकदमच आमच्या डोळ्यांत शिरत होता. कांहीं परदेशी बायका गाणीं म्हणत मिनाराच्या पायऱ्या चढून येत होत्या. हजामानं बसलेल्या माणसाचं डोकं उभ्यानं पाहावं तसं ताजचं पोकळ डोसकं आम्हाला मिनारावरून दिसत होतं !

"पगडी घातलेल्या म्हाताऱ्या निझामासारखा ताजाचा घुमट दिसतो." टिल्या म्हणाला.

"ह्या थडग्याच्या सहवासामुळं यमुनासुद्धां इथें यमुनेसारखी दिसत नाहीं." मी म्हणालों.

" रास, चांदणं, गोपी, वेणुनाद, कशाचा पत्ता नाहीं ! "—टिल्या.

हळूहळू भिंती चाचपत आणि दिव्यप्रेमाला शाप देत, मिनाराचा चाटोळा जिना आम्हीं उतरलों. चौथऱ्यावर आलों, आमचे जोडे ताब्यात घेतले, एक वेळ खालच्या उद्यानात चारी दिशांना फिरलों, आणि मग ताजकडे तोंड करून लांब, पहिल्या अंगणाच्या प्रवेशद्वारात उभे राहिलों. समोर तोच कंटाळा येईपर्यंत चित्रात, दिनदर्शिकेत, रेल्वे-वेळापत्रकावर, पाठ्य पुस्तकात पहिलेला देखावा आमच्या दृष्टीवर मूर्तिमंत आदळत होता. घुमट, ते मिनार, तो चौथरा, ते पाण्याचे पाट, पुष्करणी आणि सुरूंचे सोट !

"...मुमताजमहल मेली आणि त्या दुःखानं बादशहाला भयंकर धक्का बसला ! पुढं कांहीं वर्षांनंतर झुरून झुरून आग्रा किल्ल्यांतून ताजकडे टक लावत या थोर आणि प्रेमी बादशहानं प्राण सोडले. त्याची लाश इथं त्याच्या आवडत्या राणीशेजारींच पुरण्यांत आली."—वाटाड्या आपल्या चर्पटस्तोत्राचा उपसंहार करीत म्हणाला.

" झूट बिलकुल झूट ! " टिल्या फिस्कारला. " मुमताजच्या मृत्यूमुळं प्रेमी शहाजहानला धक्काहि बसला नाहीं आणि तो झुरणीस्हि लागला नाहीं. त्याचं वजन घटायला त्याचा सुपुत्र औरंगजेब जो कांहीं कारण झाला असेल तो असेल ! एकेका बायकोसाठीं झुरायचं शहाजहाननं ठरवलं असतं, तर त्याचं हाड शिल्लक राहिलं नसतं ! "

" मग तुझं म्हणणं काय आहे ! "

" माझं नाहीं; मनुची नांवाच्या मोंगल दरबारांत असलेल्या इटालियन इतिहासकाराचं हें म्हणणं आहे. मनुची म्हणतो, की एखाद्या निष्ठावंत नियकरासारखा किंवा धीरगंभीर राजसारखासुद्धा शहाजहानचा शेवट झाला नाहीं. त्याच्या अखेरच्या दिवसातहि त्यानं ताजमहालइतक्याच

विनोदी कृति केल्या. आपण उगीचच कल्पना करून घेतली आहे, कीं आग्र्याच्या किल्ल्यांत बंदी असणारा बादशहा बोलत नव्हता, खात नव्हता, पीत नव्हता; नुसतं " हाय मुमताज–हाय मुमताज " असं सुस्कारे सोडून म्हणत, आणि वारंवार ताजकडे पाहत ती गंभीर दुःखाची धीरोदात्त मूर्ति शेवटीं अनंतात अंतर्धान पावली ! "

" तर मग काय तुझं म्हणणं असं कीं ताजकडे टक लावून शहाजहान मेला नाहीं ? "

" मरताना त्याचं तोंड ताजकडे असेलहि ! ताज लाबून दिसतो ह्याला तुझामाझा उपाय नाहीं आणि त्याचाहि मग राहिला नव्हता ! पण तुरुंगातल्या अखेरच्या महिन्यातल्या अखेरच्या दिवसापर्यंत बनेल तितकी मौज करण्याचाच शहाजहानचा प्रयत्न होता. त्या मजेपायींच मृत्यूनं त्याला गांठलं."

" कसं ? "

" औरंगजेबानं शहाजहानला कैदेंत ठेवलं असलं, तरी मद्य, दासी, लवंड्या, ह्यांची त्यानं आपल्या जन्मदात्याला तिथेंहि कमतरता ठेवली नव्हती. हे अमर कीर्तीचे म्हातारेबोवा, त्या वयातहि धुंद होऊन अफलातून लावण्या रेकून म्हणत आणि हे ओरडूं लागले कीं पहारेकरी बुद्ध्या घंटा वाजवून आणि बार काढून त्याचा तो आवाच बुडवून टाकीत. मनुची म्हणतो कीं, "एकदां शहाजहान बाबा आरशांत आपलें रूप न्याहाळीत असता त्याच्या असें लक्षात आलें कीं आपल्याच दोन दासी हातवारे आणि अश्लील अभिनय करून त्याना अवगत असलेल्या आपल्या कांहीं नाजुक वैगुण्याची चेष्टा करीत आहेत. तरुणींकडून थट्टा, आपली, आणि असल्या विषयांत होण्याचा प्रसंग यावा ही गोष्ट त्या वयांतही त्या मानी व रसिक राजाला खपली नाहीं. तत्काळ गुण आणण्यासाठीं रागारागानें



..... शहाजहान बाबाच्या लक्षांत आलें, कीं आपल्या दासीच आपल्या नाजुक वैगुण्यांची चेष्टा करीत आहेत......

त्यानें कसलेंसें पौष्टिक व बलवर्धक औषध जरा जादा प्रमाणात घेतलें आणि त्या औषधानें त्याला साऱ्याच आधिव्याधींतून अगदीं कायमचें सोडवलें!" बोला, पवित्र प्रेमाच्या पुजाऱ्याला शोभण्यासारखाच हा विनोदी शेवट आहे की नाहीं? धीरगंभीर प्रियकर हावरेपणाने वर्तमानपत्रातलीं विज्ञापनें वाचतो, हुपटघाईनें कसलें तरी पेटंट औषध ढोसतो आणि चेष्टेखोर लवंड्यांच्या डोळ्यांत भरण्याऐवजीं स्वतःच डोळे पांढरे करून स्वर्गीय प्रेमासाठीं थेट स्वर्गांत जातो. मुमताज वरून त्यानें ताज ओवाळला असेल तर ह्या उंडग्या दासीवरून तो स्वतःचा "म्हातारा जान कुर्बान" करतो! आतां?"

"राम–राम!" मी म्हणालों. "त्यापेक्षां इथं एखादं मारुतीचं मंदीर असतं तर कपाळाला शेंदूर लावून आणि घंटा बडवून पुण्य तरी जोडलं असतं!"

बारंवार कुर्निसात करणाऱ्या वाटाड्याला अर्धअंधाराचा लाभ घेऊन आम्हीं कांहीं ग्वालेरी पैसे दिले आणि टांग्यांत जाऊन बसलों. टांगा चालू होतांच टिल्यानें खिशात बोटें घातलीं आणि चिमूट माझ्यापुढें धरून तो म्हणाला,

"ही ताजची आणि स्वर्गीय प्रेमाची बरोबर घेतलेली आठवण!"

" म्हणजे ? तूं त्या चिरनिद्रेंत गुंतलेल्या जोडप्याच्या थडग्याला मध्येच इतका जो चिकटला होतास तो हे रंगीत खडे खरवडण्यासाठींच कीं काय ? "

" मीच कशाला ? अगदीं मूर्च्छित झाल्यासारख्या दिसणाऱ्या आणखीहि कांहीं लोकांचा हाच स्तुत्य उपक्रम तिथें चालू होता ! शहाच्या नकली प्रेमाची आठवण म्हणून हे खोटे खडे ठीक आहेत ! "

" आता तो वाटाड्या पुन्हा मांगूं लागेल, कीं यहां सब हिरे और मोती लगे हुये थे ! अब वो सब निकाले गये ! "

—आणि त्याच वेळीं ग्वालेरी पैशांनीं भरलेली मूठ हालवीत आमच्या दिशेनें धावणारा वाटाड्या अधिकाधिक मागें पडत होता !

—विविधवृत्त, दिवाळी ४७



## ताजमहाल : ( पुरवणी )

### दिव्य प्रेमाचें सुंदर प्रतीक कीं—??!!

"ताजमहाल" विषयीं आम्हीं लिहिलेला लेख बऱ्याच पोटदुखीस कारणीभूत झाला. कांहींचीं पोटें हंसून दुखलीं व त्यांनीं आम्हांस आमच्या तत्त्ववेधक, अभिनव, क्रांतिकारक, काटेकोर व सत्यान्वेषी सौन्दर्यबुद्धीविषयीं धन्यवाद दिले. श्रमिकांची पिळणूक करून इमले उठविणाऱ्या शहाजहान नामक भांडवल शहाची भली भंबेरी उडविल्या-विषयीं क्रेमलिन मधील शहानशहा फार प्रसन्न झाल्याचें आम्हांस विश्वस-नीय गोटांतून कळलें. अंध मूर्तिपूजकवृत्तीनें "ताजमहाल"ची पत्थरपूजा करणाऱ्या काफीरी परंपरेचे वाभाडे काढल्याविषयीं कराचीच्या "डॉन"नें बहोत खूप होऊन आम्हांस अभिनंदनपर तारा पाठविल्या. शेंकडो अश्राफ औरतींना एका फटक्यात शादीच्या जंजीरीनें बांधून ठेवणाऱ्या; त्यांचीं पडद्यात कुचंबणा करणाऱ्या, निर्जीव नवेरपणाच्या सुळावर त्यांस आजन्म खिळवून ठेवणाऱ्या, भोगशून्य भोगदासींच्या भयानक अवस्थेप्रत त्यांस नेणाऱ्या व वर दिव्य प्रेमाचें श्रेय उपटू पाहणाऱ्या शहाजहानच्या पुरुषी ढोंगधत्तुऱ्याचा ताबूत आम्हीं थंडा केल्याविषयीं डाक्क्याच्या "भॉगिनो मोंडलानें" ( मराठी भाषांतर : " भगिनी मंडळ " ) आम्हांविषयीं कृतज्ञता व्यक्त करणारा ठराव पसार केला. लाहोरच्या "मजलिस अल् अखबार उल् मोगल" ह्या इतिहास संशोधक संस्थेनें तर आमच्या भरभक्कम ऐतिहासिक दृष्टीची एका पर्शियन गझलाच्या द्वारें स्तुति करून पुराव्या

विना विधान न करणाऱ्या आमच्या दुर्मिळ प्रामाणिक वृत्तीचें, तसेंच इतिहासाचा दिव्यदृष्टीस दिसणारा कडू जहर बोधहि निश्चयानें लोकांच्या गळीं उतरविणाऱ्या आमच्या नवनव अतिनव शास्त्रपूत उत्साहाचें एका प्रशस्तीपत्राद्वारा कौतुक केलें.

येवढें सारें झालें, तरी वेगळ्याच प्रकारच्या पोटदुखीनें पछाडलेले काहीं लोक आम्हांकडे आले व आमच्या मौलिक लिखाणाविषयीं काय कसें करूं लागले. त्यांचा दुखरा स्वर, चिडका सूर, भरड वेष, अस्ताव्यस्त अवतार व अहिंसक आवेश पाहिल्यावर क्षणभर आम्हास असा भास झाला कीं "ताजमहाल"वर लेखणी चालविण्या ऐवजीं जणूं कांहीं आम्हीं त्याच्याच एखाद्या पितराच्या थडग्यावर पाय दिला होता.

"तुम्हीं रूढीप्रिय बुरसटलेले असल्यामुळें असा लेख लिहिलात" ते फणफणत आम्हाला म्हणाले. "आम्हीं रूढीभंजक असल्यामुळें असा लेख लिहिला" आम्हीं म्हणालों. "ताजमहालाचीं स्तुतिस्तोत्रें गाणें ही बुरसट रूढी आहे व तिच्या विरूद्ध आम्ही बंड करीत आहोंत" आम्हीं पुढें म्हणालों. व रूढी भंजनाची ललकारी देत असता शिरस्त्याप्रमाणे आम्हीं आमची छाती थोडी पुढे काढली. "छातीवर हात ठेऊन तुम्हीं सांगाल काय कीं तुम्हीं म्हणतां हें खरें आहे !" ते म्हणाले. "छातीवर हात ठेऊन आम्हीं सांगू" आम्हीं म्हणालों व त्यांच्या छातीवर हात दिला, तो त्यांनीं घाईनें दूर सारला तेव्हा आमचा हात आमच्याच छातीवर ठेवून आम्हीं त्यांना निर्वाळा दिला कीं आम्हीं जें सांगितलें तें खऱ्याचें नावानेंच सांगितलें. तेव्हा ते म्हणाले कीं एकांतिक व एककल्ली मतासाठींच आम्हीं प्रसिद्ध आहोंत. आम्हाला सर्वांगीण सत्य कसें दिसणार ? तेव्हा आम्हीं उत्तर केलें कीं समतोलपणाविषयींच आमची प्रसिद्धी आहे. कशा विषयींच एकांतिक किंवा एककल्ली आग्रह आम्हीं धरत नसतो

सर्वांगीण सत्याचें सर्वांस दर्शन व्हावें म्हणूनच आमचा "ताज" विषयक लेख आम्हीं लिहिला. तुम्हीं स्वतःस एकांगी किंवा एककल्ली समजत नसाल, परंतु शहाजहानच्या दिव्य प्रेमाविषयींचा व ताजच्या सौंदर्या-विषयींचा तुमचा अट्टाहास आम्हास एकांगी व एककल्ली वाटतों येवढेंच नव्हें तर आंधळा व आततार्इमुद्धा वाटतो. ह्या आततार्इ वेडास आमचा सक्त विरोध आहे. माणसानें नेहमी समतोल असावे व सत्याची सर्वांगीण ओळख त्यानें करून घ्यावी. आम्हींच तेवढे सत्यप्रतिज्ञ, सहिष्णु व समतोल सौंदर्योपासक असा एककल्ली आग्रह त्याने धरूं नये.

ह्यावर आमचे पृच्छक काहीक्षण निरुत्तर झाले व आपण निरुत्तर होत आहोत ही जाणीव त्यास होतांच अहिंसक पद्धतीने चिडून व रागावून ते ओरडले "म्हणजे ताजमहाल हे एक भिकार थडगे आहे असेंच ना तुमचे म्हणणें ?" "थडगें तर तें आहेच" आम्हीं (शांतपणें) म्हणालो. बादशहाचें असलें म्हणून काय झालें ? आतां भिकार हा शब्द वाटल्यास मी वापरीत नाहीं. पण त्याचें सौंदर्य मला फार संशयास्पद वाटतें येवढे निश्चित. ख्यातनाम गांधीवादी आचार्य शं. त्र्यं. तथा दादा धर्माधिकारी म्हणतात की त्यांच्या मातोश्रीस ताज अशुभ, मुतकी व उदासवाणा वाटला, (शब्द अगदीं हेच नसतील पण अर्थ हाच ! पहा; "सत्यकथे"चे गेल्या तीन-चार वर्षातले अंक.) श्रमिक प्रश्नाचा जिव्हाळयानें अभ्यास करणाऱ्या लेखिका गीता साने ताजचें नाव निघताच भिस्कीलपणें हंसून आम्हास मुंबई मुक्कामीं दिनांक २४-२-५१ दिवशीं दुपारी तीन वाजून एकावन्न मिनीटांनीं म्हणाल्या कीं "ताजपेक्षा आमच्या न्हाणीघराचे दगड अधिक शुभ्र आणखी सुंदर आहेत"..."

ह्यावर आमच्या पृच्छकांपैकीं एक आपल्या डोक्यावरची मळकी पांढरी टोपी हातावर आपटून चवताळलेल्या स्वरात ओरडला " बस्

बस् ! तुमचें म्हणणें कांहीं असेल तर तें प्रथम सागा !"

"आमचें म्हणणें आमच्या लेखात आम्हीं सांगितलेंच आहे" आम्हीं (पुनः शांतपणें) म्हणालों, "परंतु कमी समज असलेल्या माणसासाठीं आमचे म्हणणें पुनः एकदां सांगावयास आमची आडकाठी नाहीं. सर्वांगीण सत्याचा प्रचार करायचा म्हणजे येवढा त्रास घेतलाच पाहिजे. त्याशिवाय एकांतिकता व एककल्लीपणा ह्यांचा बंदोबस्त कसा होणार ? काय, खरेना !" आम्हीं पुसले.

"बोला–बोला–" हातातल्या टोपीनें मेजावर वार करीत तो चवताळलेला पृच्छक म्हणाला.

"आमचें पहिलें, शेवटचें व मुख्य विधेय–याने आपला मुद्दा— असे कीं ताजमहाल सुंदर असेल किंवा नसेल पण तें शहाजहानच्या दिव्य प्रेमाचे प्रतीक असूं शकत नाहीं. दिव्य प्रेमाच्या कल्पनाची पार उलथापालथ केल्याविना शहाजहानवर दिव्य प्रेमाचा व "ताज" वर त्या प्रेमाच्या प्रतीकत्वाचा आरोप करता येणार नाहीं. ह्या जगांत शुद्ध, काव्यमय, प्रामाणिक, एकनिष्ठ प्रेमाशीं जर कोणाचा कमींत कमी संबंध असेल तर तो ताजचा व शहाजहानचा. शहाजहानला तुम्हीं नीट ओळखलेले दिसत नाहीं. ती वेगळयाच स्वभावाची वल्ली होती." "तुमच्या बोलण्याला पुरावा काय ?" मळकट टोपींतला पृच्छक म्हणाला "आम्हांला पुरावा पाहिजे पुरावा !" लाड्या पंचातला मुनी म्हणाला.

"पुरावा–पुरावा–पुरावा द्या पुरावा !" अर्धा इंच दाढी वाढलेला बोडलेल्या डोक्याचा यति म्हणाला.

"देतो" आम्हीं म्हणालो "घरीं आलेल्या तुम्हां साधुसंतांचें इतिहासाचें वाचन आहे त्यापेक्षां थोडे अधिक असते. तर शहाजहानच्या

that crime might be blended with their mutual affection. This was a popular rumour, which never had any other foundation than in the malice of the courtiers."

आमचें वाचन संपते न संपतें तों ते तिघेहि किंचाळले "पाहिले ? ती अफवा होती". त्यावर आम्हीं म्हणालों, "म्हणजे एकूण साहेबांच्या शब्दावर तुमचा विश्वास आहे म्हणावयाचा. तर मग जहानआराच्या अनुपम सौंदर्यासमवेतच तिच्या पाताळयंत्री धूर्ततेचा साहेबानें करून ठेवलेला उल्लेखहि आपण ध्यानात ठेवला पाहिजे. व धूर्त माणसें सहसा साक्षी पुराव्यानिशी पकडलीं जात नाहींत, हेंहि विसरता कामा नये. ही अफवा खरी असो वा नसो, परंतु कात्रूच्या "चाजहाम" ला शेंकडो स्त्रिया व उपस्त्रिया होत्या हे मात्र वादातीत सत्य आहे. व हें सत्य दिव्य, काव्यमय, एकनिष्ठ प्रेमाशीं रतिमात्र सुसंगत नाहीं. माझें म्हणणें मुख्यतः हेंच आहे. वाटेल त्याचें मुंडके मारावयाची शक्ती असलेल्या शहाजहान विषयीं त्या अरेराव काळातहि एक विलक्षण किंवदन्ती इतक्या चिवटपणें जीव धरून जगूं शकली हें तुम्हीं स्मरणात असूं द्यावें !"

त्यावर आमचे पाहुणे काहीं काळ मख्खा सारखे नुसते गप बसले व म्हणाले, "पाहूं या ते तुमचें पुस्तक !" "पहा" आम्हीं म्हणालों "ट्रॅव्हल्स इन द मोगल एम्पायर, लेखक फ्रॅंस्कॉय बर्नियर, (Francois Bernier) हम्फ्रे मिलफर्ड ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसनें (लंडन एडिनबर्ग, ग्लासगो, न्यूयॉर्क, टोरांटो, मेलबर्न, बॉम्बे) प्रकाशित केलेले. १९१४ ची आवृत्ती. आता हा दुसरा उतारा ऐका. हा मनुची नामक मोंगलकालीन इटालियन प्रवाशाचा हवाला देतो. मुमताजमहाल पैगंबरवासी झाल्यावर व पितृऋण फेडण्यासाटीं औरंगजेबानें शहाजहानबाबांना आग्र्याच्या किल्ल्यात कैद करून ठेवल्यावर ह्या वयातीत

रसिकवर्यांचा काय कार्यक्रम होता व अखेर त्यांचें मरण कोणत्या विनोदी पद्धतीनें ओढवलें त्याची रामकहाणी प्रस्तुत उतारा सागतो. ऐकाः " **But some incidents of the ex-emperor's captivity are more amusing than affecting**. Aurangzeb, while greatly desiring his father's death, could not bring himself to order an act of direct violence Instead he tried to frighten the old man to death by ordering his guards to beat kettle drums and gongs continually under his window, to exchange shots, shout war cries and break earthenware jars by throwing them against the wall. Shah Jehan was, according to court rumour, quite unmoved by this uproar and disappointed the hard working performers outside his window, **by getting noisily drunk, dancing, singing obscene songs and shouting for the prettiest of his slave girls**. Various attempts to poison him failed. Finally, if we are to believe contemporary gossip **his death came about through his own vanity** and not through his son's patient malevolence.

**One morning, when he was waxing his moustache in front of a mirror he saw in the glass two slave girls who were standing behind him making derisive gestures to each other in mockery of their master's feeble virility. This was a subject on which the old man was deeply sensitive. He at once ordered a large supply of aphrodisiacs. After taking an overdose of these he fell into so deep a stupor that, in manu. cci's phrase he could not even smell the smell of an apple. He never recovered consciousness "**

पहा मंडळी ! आम्हीं म्हणालों, पहा हे डेनिस किंकेडने आपल्या " ग्रॅण्ड रिबेल" मध्यें दारू पिऊन थैमान घालणाऱ्या, अश्लील गाणीं रेकणाऱ्या, आपल्या खुबसुरत लौंडीच्या नांवानें तारस्वरांत किंकाळणाऱ्या, व त्याच लवंड्यांनीं स्वतःच्या गलितगात्र

bad. **Indeed it seems to me that any one who professes an ardent admiration for the Taj must look at it without having any standards of excellence in his mind...Compare it with these and the imperial mausoleum at once takes its proper place in the heirarchy of art-well down the best. But it is made of marble. Marble, I perceive, covers a multitude of sins.**"

"पाहिलेंत साधुजन हो?" हातांतील पुस्तक त्यांचें नाकासमोर धरीत आम्हीं म्हणालों "ह्या शिल्पशास्त्री साहेबानें ताजची कशी शोभा केली आहे ती! ताज ही शुद्ध फसवणूक (Swindle) आहे, असें तो म्हणतो. ताज निराशाजनक आहे असें तो म्हणतो. उत्तम शिल्पकृतीशी तुलना केल्यावर ताज फार उणा भरतो असें तो म्हणतो. हिंदू शिल्पकाराच्या कलाकृती व चितोडचें मंदिर (दक्षिणेंतील मंदिराची गोष्टच सोडा) ताजपेक्षां फार सरस आहेत असें तो म्हणतो. ताजचें कौतुक करणाऱ्यांनी उत्तमत्वाचीं वजनमापें नाहींत असें तो म्हणतो. केवळ दर्शनी संगमरवरानें ताजच्या खंडीभर पापावर पांघरूण घातलें आहे असें तो म्हणतो. आमचेंहि मत ह्या विषयांत ह्या साहेबासारखेंच आहे."

"तुमचें मत आम्हाला प्रचारकी वाटते" दाढीवाला म्हणाला.

"प्रचारकी थाटाचें वाटतें" टोपीवाला म्हणाला.

"प्रचारकी वृत्तीचें वाटतें" पंचेवाला म्हणाला.

"आमचें मत कलात्मक थाटाचें, वृत्तीचें व पद्धतीचें आहे. उलटपक्षीं शहा–ताजविषयींचीं तुमचीं मतें मात्र आम्हांस मोंगलाईतल्या एखाद्या प्रचारप्रभू (Publicity officer) सारखीं वाटतात. जेथें हॅवलें साहेबानें सुद्धां—

"साहेब अध्यात्म दृष्टींत उणा आहे" दाढी. "नीतिमत्तेत कमी आहे." पंचा. "उद्धाराचा मूलमंत्र त्याला अखेर आमच्या पासून घ्यावा

लागेल."—टोपी. "घ्यावा लागेल तेव्हां घ्यावा लागेल" आम्ही म्हणालों "पण आज मात्र एंजिनें, मोटरी, एनिमे, टाचण्या, बंदुकींच्या व औषधाच्या गोळ्या वगैरे वस्तू आम्हांसच त्यांच्या पासून घ्याव्या लागत आहेत. शिस्त, दूरदर्शीपणा, कर्तव्यनिष्ठा, सचोटी, सार्वजनिक चारित्र्य, मुत्सद्देगिरी, ज्ञानलालसा, देशभक्ती, स्वच्छता, धर्माभिमान, सहकार्यबुद्धी, गंभीरता, धाडस, परमतसहिष्णुता इत्यादि इत्यादि शेंकडो वस्तू आम्हीं त्वरेनें त्याचेकडून आमच्या देशांत आयात केल्या नाहींत तर दळिद्री विटकरी अंतरंगावर पाढऱ्या संगमरवराची अध्यात्मिक झिलई चढविणाऱ्या आम्हा महाभागांना जगाला संदेश देण्यापलीकडे दुसरे काम उरणार नाहीं. पण हें विषयांतर होत आहे. तुम्हांला साहेबाचें ताजविषयक मत ग्राह्य वाटत नसेल तर आतां श्री. अनंतराव काणेकरासारख्या समतोल, रसिक व स्वतंत्र बुद्धीच्या मराठी लेखकाचें मत वाचून दाखवितो."

आम्हीं हें बोलत असता आमचा श्रोतृवृंद जरासा चुळबुळत होता. "काय साहेबाची देशभक्ती आमच्यापेक्षा मोठी?" असें कांहींसें ते बोलत होते. आम्हीं दडपून पुढें बोलू लागलो—

"हें श्री. काणेकराचें "आमची माती आमचें आकाश" नामक प्रवास पुस्तक. ( लेखकः— श्री. अनंत काणेकर. चित्रकार श्री. दीनानाथ दलाल. मूल्य साडेचार रुपये. मौज प्रकाशन लि. गिरगांव, मुंबई ४ ) पान एकशे सात. "ताजमहाल खरोखरच सुंदर आहे काय?" ह्या धावत्या शीर्षका पासून सुरू होणाऱ्या लिखाणांतील हा कांहीं भाग— इति काणेकर—

"......ताजमहालाला सुंदर म्हणणें हें आतां ठरूनच गेलें आहे. सुंदर नाहीं वाटला, तरी तसें म्हणण्याचें धाडस कुणीच करीत नाहीं...

आमचे नाईक मात्र कुणी ताजमहालची स्तुति करूं लागला कीं, आपला कुणी एक शत्रू असेल तर ताजमहाल, अशा आवेशानें तास सव्वा तास अस्खलित वक्तृत्व करूं लागतात. हंपी विरूपाक्षा सारख्या हिंदु शिल्पकलेशी तुलना करतां ह्या ताजमहाल मध्यें कांहींच तथ्य नाहीं......नाईक म्हणाले. कसलेल्या वकीलाच्या कौशल्यानें ताजमहाल विरूद्ध दहा बारा मुद्दे त्यांनीं आम्हाला सांगितले. या देशातल्या बहुतेक कलाकौशल्याच्या वस्तू आणि वास्तू हिंदूंच्या आहेत,......ब्रिटिश येण्यापूर्वीं ताजमहालचा फारसा बडेजाव कुणी सांगत नसे, कांहीं शहाणे तर ताजमहालपुढल्या बागेचीहि "अहाहा, काय बाग" म्हणून बाग अलीकडचा आहे हें विसरून, स्तुतिस्तोत्रें गाऊं लागतात! हे मोगल बादशहा रिकामटेकडे असत आणि जयपूरचा फुकटात पडलेला संगमरवरी दगड आणि पोटावारी राबवून घेतलेले वेठीचे मजूर मिळून हा ताजमहाल त्यांनीं बांधून घेतला. आषाढी पौर्णिमेच्या दिवशीं ताजमहालावरल्या घुमटाच्या बरोबर वरती चंद्रबिंब दिसते म्हणून त्या दिवशीं शेंकडो लोक "काय हा चमत्कार" म्हणून पहावयाला जातात. नाईक म्हणाले, या मूर्खांना माहित नाहीं कीं त्यावेळीं जगांतल्या कोणत्याहि इमारतीच्या बरोबर शिखरावरती चंद्र दिसतो. मुसलमानी शिल्पकलेंत घुमट बोडके असतात; ताजमहालाच्या घुमटाला थोडी बहुत जी काय शोभा आहे, तिचें कारण हिंदुपद्धतीचा सोनेरी कळस वर बसविला आहे. "जॅस्मिन टॉवर" वरल्या त्या पैशाएवढ्या कांचेंत सबंध ताजमहालाचें प्रतिबिंब दिसतें त्याचें कौतुक करणारे तुम्हांला भेटलेच असतील. नाईक म्हणाले, चष्म्याच्या कांचेंतहि सबंध ताजमहाल दिसतो हें त्यांना माहीत नाहीं!

या भाष्यानंतर नाईकांनीं दोन तीन महत्त्वाचे मुद्दे सांगितले, ते खरोखरच आपणाला विचार करायला लावतात,...ताज-

महालच्या भिंती विटांच्या आहेत, बाहेरचा पापुद्रा पांढऱ्या संगमरवराचा आहे,....आम्हीं ताजमहाल पहायला गेलों तेव्हां एका बाजूच्या भिंतींची दुरुस्ती चाललेली होती, आणि आम्हीं प्रत्यक्ष आमच्या डोळ्यांनीं आंतल्या विटा पाहिल्या होत्या. दुसरी एक नोईकांनीं सांगितलेली गोष्टहि आम्ही प्रत्यक्ष पाहिलेली असल्यामुळें आम्हांला पटली, बाहेर वापरलेल्या पांढऱ्या संगमरवरी दगडाचे तुकडे सर्व सारख्या आकाराचे नाहींत, त्यांतले कांहीं लहान तर कांहीं मोठे आहेत. सर्वच पांढरा रंग असल्यामुळें ही विषमता ध्यानांत येत नाहीं इतकेंच ! शेवटीं नाईक म्हणाले, अहो पांढरा दगड मधून मधून शोभेसाठीं वापरावयाचा असतो, त्याचीच सर्व इमारत बांधून कसें चालेल ? भात भाजी न वाढता नुसता कोशिंबिरीचा ढीग तुमच्या पुढ्यांत कुणी ठेवला तर तुम्हांला काय वाटेल ?...अलीकडे कलात्मक दृष्टीचे लोक आपल्या बंगल्यांतल्या "बाथरूम" आणि "लॅट्रीन" ला जो "मटिरियल" वापरतात तो या वेड्या बादशहानें सबंध इमारतीसाठीं वापरला ! येथें आम्हीं थांबलों. आमच्या श्रोत्यांचे चेहेरे कावरे बावरे झाले होते. "ताज" वर चीज पडत असल्याचें पाहून या "ताज" भूकंपाचे ठिकऱ्या करणारे थक्के खास असल्याचें पाहूनहि कदाचित् ते इतके घाबरले नसते. त्यांच्या दुःखाविषयीं तसेच त्यांच्या हेकट मूर्तिपूजक वृत्तीविषयीं आम्हांस वाईट वाटलें. पण सौंदर्य व सत्य ह्यांच्या वांवाचें आमचें दुःख गिळून आम्हीं पुढें म्हणालों.

"हक्सले गोरा साहेब, म्हणून त्याचें मत तुम्हाला संशयास्पद वाटतें. आतां हक्सलेविषयीं व त्याच्या ताजविषयक मताविषयीं कायेकर काय म्हणतात तें पहा."

आम्हीं पान एकशे नऊ पासून निवडक वाक्यें वाचूं लागतो—

"...ताजमहाल ही वस्तुकलेच्या दृष्टीनें एक हीन कलाकृती आहे, हें कांहीं वर्षांपूर्वी आल्डूस हक्सले या प्रख्यात इंग्लिश लेखकाच्या "जेस्टिंग पायलेट" या प्रवासवर्णनपर पुस्तकांत मी वाचलें होतें. वाङ्मय आणि कला या विषयांवर अधिकार वाणीनें बोलणाऱ्यांपैकीं आल्डस हक्सले हा आहे, आणि त्याचीं मतें विचारणीय असतात यांत मुळींच शंका नाहीं......एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अलीकडे हक्सले मोठा वेदान्तप्रेमी अध्यात्मवादी झाला आहे, पण तो हिंदुस्थानांत येऊन गेला आणि त्यानें "जेस्टिंग पायलेट" हें पुस्तक लिहिलें तेव्हां तो पाखंडी मताचा जडवादी म्हणून इंग्रजी वाङ्मयांत प्रख्यात होता. या पुस्तकांत देखील...... माणसांची उपासमार उघड्या डोळ्यांनीं पाहणाऱ्या अध्यात्मवादी हिंदूंची टिंगल केली आहे. तेव्हां हिंदूबद्दल आपुलकी वाटते आणि मुसलमानाबद्दल तिरस्कार वाटतो म्हणून त्यानें हिंदू देवालयांची स्तुति केली आणि ताजमहालला तुच्छ लेखलें असें म्हणतां येणार नाहीं. एक निःपक्षपाती कलावंतानें केलेली टीका म्हणूनच ताजमहाल संबंधींच्या त्यांच्या मतांकडे पाहिलें पाहिजे."

आम्हीं पुस्तक मिटलें व आमच्या पाहुण्यांना विचारलें "पटली निश्चिती? कीं आहार, विहार, संगीत, क्रिकेट, रुपयाचा भाव, निर्नियंत्री-करण वगैरे विषयांत जसें जाणत्या माणसांना तुम्ही मुनीजन धुडकावून लावता तसेंच शिल्पशास्त्राच्या विषयांत ह्या साहेबाला लावणार आहात?" आमच्याकडे अजीर्ण झालेल्या अस्वलाच्या गढूळ दृष्टीनें पाहून ते म्हणाले "आपल्या लिखाणानें तुम्हीं अस्वस्थता निर्माण करीत आहांत व

लोकांच्या भावना दुखवीत आहांत त्यापेक्षां आपलीं मतें तुम्हीं आपल्याच जवळ ठेवाल तर बरें होईल. ”

ह्यावर आम्हीं म्हणालों कीं लोक जर आपलीं मतें स्वतःजवळच ठेवतील तर कदाचित् आम्हींहि आपलीं मतें आमच्या पाशींच ठेवण्याचा विचार करूं तसेंच लोकांच्या दुखऱ्या भावना पेक्षां आम्हांला ( व तुम्हां-लाहि ) आमच्या भावनांविषयीं अधिक विचार केला पाहिजे. सत्य व सौंदर्य ह्यावर आधारलेले आमचे विचार सांगितल्यामुळें अस्वस्थता उत्पन्न होते कीं नाहीं तें आम्हांस ठाऊक नाहीं परंतु आमचे विचार दडपून टाकलें गेल्यास आम्हीं निश्चितच अस्वस्थ होऊं व आमच्या अस्वस्थतेमुळें परिणामी तुम्हांसहि अस्वस्थ व्हावें लागेल ”.

ह्यावर कांहींच न बोलतां तडका फडकी “मुफेर” करून आमचे पाहुणे चालू लागले. त्यांचें मतांतर कदाचित् आम्हीं घडवून आणलें नसेल. पण आमचेंहि मतांवर त्यांनीं घडवून आणलेलें नाहीं. ते आम्हांला बहुधा दुराराध्य समजत असतील. परंतु आम्हींहि त्याना त्याच तर्क शास्त्रान्वयें अगदीं असुधारणीय असे दुराराध्यच समजतो.

